# अनुक्रमणिका

# पुरस्कार

गुदस्तां भा. इ. सं. मंडळाच्या ३१ व्या संमेलनांत **'वैद्य दफ्तरांतून निवडलेले कागद'** खंड १ याचें प्रकाशन झालें, तेव्हां २ रा खंड पुढील सालीं असाच बाहेर पडावा अशी सर्वांनीं सदिच्छा व्यक्त केली. त्याप्रमाणें २ रा खंड जरी नाहीं तरी १ ल्या खंडाइतकीच मोठी त्याची **पुरवणी** या संमेलनांत बाहेर पडत आहे, याबद्दल सर्व संशोधकांस आनंद वाटल्यावांचून राहाणार नाहीं. या पुरवणींतील पत्रें पहिल्या खंडांतल्याप्रमाणेंच बव्हंशीं हिशोबाचीं आहेत. तरी त्यांची सनदा, आज्ञापत्रें, मेस्तकें, जाबसालीं पत्रें, याद्या, कर्जरोखे, कदबे, सिलकबंद, हिशेब या प्रकारची वर्गवारी लावितां येत असून श्री. वैद्य यांनीं प्रस्तावनेंत त्यांची सुबोध समजावणी दिलेली पाहातां प्रस्तुत पुरवणीपत्रांचें महत्त्व कळून येणार आहे. सप्रे, खंडकर, हणमंते, सरलष्कर, रानडे, जोशी, जगथाप, शिर्के इत्यादि अनेक घराण्यांतील व्यक्तींची माहिती यांत नवीनच मिळते व त्यांच्या वंशावळी काढण्यास उपयोग होतो. हणमंते आणि सरलष्कर या घराण्यांची वंशावळच श्री. वैद्य यांनीं जमवून देण्याचा मोठा खटाटोप केला आहे व इतर अनेक व्यक्तींचा त्यांच्या विद्यमान वंशजापर्यंतचा तलास लावण्याचा त्यांनीं असाच आटापिटा केलेला दिसेल. शेवटच्या व्यक्ति-सूचीवरून किती तरी जणांचा या वैद्य घराण्याशीं संबंध होता याचें आश्चर्य वाटूं लागतें.

मागील खंडांतल्या पुरस्कारांत आम्हीं म्हटल्याप्रमाणें सावकारी हिशेबाचा शास्त्रीय अभ्यास करण्याचें अद्याप कोणाच्या मनांत येत नाहीं. त्यासाठीं साधनें आज किती तरी प्रस्तुत वैद्य दफ्तरांतील कागदांप्रमाणें पुढें आहेत व आणखी नवीन बाहेर येतील. सामाजिक आणि आर्थिक इतिहासाची ही बाजू लंगडीच आहे असें खेदानें म्हणावें लागतें. तसेंच जुन्या पत्रव्यवहाराच्या पद्धतींचा सांगोपांग अभ्यास व्हावयाचाच आहे. डेक्कन कॉलेज रिसर्च इन्स्टिट्यूटमध्यें मराठ्यांच्या इतिहासाची एक स्वतंत्र शाखा कित्येक दिवसांपासून उघडलेली दिसते; पण फारशी कार्यनिष्पत्ति अद्यापि झालेली नाहीं. या शाखेंत व इतरत्र असा पीएच्. डी. साठीं म्हणून सूक्ष्म चिकित्सात्मक अभ्यास जर जोमानें आणि जोरानें होऊं लागेल तर भा. इ. सं. मंडळांतील कागद व श्री. वैद्य प्रभृतींनीं स्वतः प्रसिद्ध केलेले अस्सल कागद कारणीं लागतील.

ज्योतिष गणिताचा अभ्यासहि चालू पिढींत बहुधा नाहीं असें खेदानें म्हणावें लागतें. फल-ज्योतिष्यांनीं तरी याकडे वळावें ! कै. दत्तोपंत आपटे यांची उणीव याबाबतींत तरी पदोपदीं भासूं लागते. कागदपत्रांचा व त्यांतील प्रसंगांचा काळ नक्की काढण्यास विद्यमान जंत्र्या नेहमींच उपयोगी पडतात असें नाहीं. शिवाय या जंत्र्यांचें प्रामाण्य पारखून घ्यावें लागतें. तेव्हां ज्योतिर्गणिताचा पंडित हुडकावा लागूं नये अशी स्थिति निर्माण झाली पाहिजे. होईल तेव्हां खरें !

या सर्व अडचणींना तोंड देऊन इतक्या उतार वयांत श्री. शंकरराव वैद्य यांनीं आपलें दप्तर लावून, अभ्यासून प्रकाशित करण्याचें सामाजिक कार्य जें आपण होऊन मागें लावून घेतलें आहे व ऐषआरामानें सेवानिवृत्तीचा सुखाचा काळ कंठण्यावर जो एक प्रकारचा तापसी किंवा तामसी बहिष्कार टाकिला आहे त्याचें चीज संशोधकांनीं न केल्यास तो एक गुन्हाच होणार आहे. सरकाला देखील वैद्य दप्तराचें महत्त्व पटलें व तें पटूनहि न पटल्यासारखेंच झालें. त्याचा इतिहास शंकररावांनीं पुढें दिलाच आहे. असो.

वैद्य दप्तराचें सर्व प्रकाशन निर्वेध आणि सुव्यवस्थित होण्यास श्री. वैद्य यांना द्रव्यसाहाय्यापेक्षां संशोधक लेखकांची मदत पाहिजे. त्यांच्या वयाकडे पाहातां दरसाल एकेक खंड बाहेर निघून चालणार नाहीं. पुढचेच कागद राजकीय महत्त्वाचे आहेत. ते लवकर बाहेर कसें पडतील याचीच श्री. वैद्य यांच्या संशोधक मित्रांना साधार भीति वाटते. तेव्हां त्यांना लागणारी मदत सरकार आणि सुबुद्ध लेखक यांनीं तात्काळ दिल्यास महाराष्ट्राच्या इतिहासाचें एक कार्य पार पडणार आहे.

या ग्रंथांतील चुका किंवा उणीवा ज्या असतील त्या बहुंशीं श्री. वैद्यांच्या शारिरिक दुर्बलतेमुळेंच आहेत. मानसिक श्रमाप्रमाणेंच त्यांना शारिरिक श्रम फार होतात हें त्यांनीं प्रस्तावनेंत सहज नमूद केलेंच आहे. तथापि त्यांनीं प्रार्थना केल्याप्रमाणें परमेश्वर त्यांच्याच हातून सर्व खंडांचें क्रमशः प्रकाशन करवील अशी आशा बाळगूं या. शेवटीं पुरस्कृत ग्रंथमालेंत हें ४२ वें पुष्प ग्रथित करण्यास मंडळास फार आनंद वाटत आहे हें सांगून हा पुरस्कार आटोपता घेतों.

पुणें,<br>ता. २५-५-४५

**चिंतामण गणेश कर्वे,**<br>चिटणीस, भा. इ. सं. मंडळ

# प्रस्तावना

१. पहिल्या खंडांत वैद्य दफ्तराचें महत्त्व 'पेशवे कालीन अमोलिक नवीन दफ्तराचा शोध' या रा.ब. सरदेसाई यांच्या निबंधावरून स्पष्ट झालें आहे. आतां एका मॉन्स ए लेहारू नांवाच्या फ्रेंचमननें अलीगड येथें भरलेल्या इंडियन हिस्टारिकल कमिशनपुढें वैद्य दफ्तराची माहिती देऊन त्याबद्दल हिंदुस्थान सरकारचें औत्सुक्य कसें दिग्दर्शित केलें याची माहिती होण्यासाठीं या पुरवणीखंडांत आरंभीं दोन इंग्रजी रिपोर्ट देऊन शेवटीं 'वैद्य दफ्तराबद्दल हिंदुस्थान सरकारचें औत्सुक्य' हा निबंध दिला आहे. त्यावरून वैद्य दफ्तराचा विस्तृतपणा व छपाईस मागितलेल्या सवलती यांची कल्पना येणार आहे. उदेपूर येथें भरलेल्या कमिशनपुढें वरील रिपोर्टाची काय वासलात लागली हें नुकतेंच कळलें आहे. हा रिपोर्ट कमिशननें दफ्तरी दाखल केला असून तो कमिशनच्या रिपोर्टांत छापला जाऊन हिंदुस्थान सरकारापुढें केव्हां तरी या वर्षांत जाईल, तेव्हां सरकार काय करतें पहावें. कमिशनच्या कामाची यावरून कल्पना होणार आहे. कमिशननें यावर कांहीं ठराव करून हिंदुस्थान सरकारचें वैद्य दफ्तराकडे विशेष लक्ष वेधण्यास कांहीं हरकत नव्हती. माझ्या मागण्या अगदीं बिनखर्ची, सरकारच्या फायद्याच्या आहेत. मी कागद ज्या छापखान्यांत छापीन त्यावर यासाठीं लागणारा कागद वापरण्यास निर्बंध असूं नये, अशी मागणी करतांना कागदाच्या अमलदारास दफ्तरचें महत्त्व पटवून दिलें तरी देखील त्यांनीं पुढील भाग छापण्यास परवानगी नाहीं असें कळविलें. तेव्हां पुनः त्यास विनंती केली कीं, परदेशी कागद आतां येऊं लागल्यामुळें सरकारास भासणारी कागदाची अडचण नाहींशी होणार आहे, ती नाहींशी होतांच, मी सरकारचें काम करीत असल्यामुळें, मला परवानगी द्यावी. त्याचें उत्तर आलें कीं, कागदाच्या कायद्यांतील निर्बंधामुळें परवानगी देतां येत नाहीं, तथापि नोंदलेल्या ( registered ) प्रकाशकां ( publishers ) मार्फत कागद छापण्यास हरकत नाहीं. पुनः या बाबतींत दिल्लीचे कागद नियंत्रण अधिकारी यांनीं गेल्या एप्रिलांत, १९४५ सालीं कागद किती लागेल याबद्दल माहिती विचारली आहे. यामुळें कागद वापरण्यास परवानगी मिळण्याची आशा वाटूं लागली आहे.

२ पहिला खंड पहिले बाजीराव अखेरच्या पत्रांचा छापून झाल्यावर आतां दुसरा खंड नानासाहेबांच्या कारकीर्दींतील पत्रांचा छापण्यांत येईल असें कोणासही वाटणें साहाजिक हात. पण कागद निवडण्याचें काम चालू असतांनाच आणखी पहिले बाजीराव अखेरच्या काळांतील जुनीं पत्रें व हिशोब सांपडले. ते आतां पुरवणी खंड १ म्हणून छापीत आहे. असें करण्याचें कारण इतकेंच कीं, वैद्य घराण्याचा ज्या घराण्यांशीं १७४० पूर्वी संबंध आला होता त्यांची माहिती व्हावी व नानासाहेब पेशव्यापासून पुढील कागदपत्रांत येणाऱ्या व्यक्तींचा वैद्य घराण्याशीं किती जुना पुराणा देव घेवीचा व आत्मीयतेचा संबंध होता हें कळावें. कागदांत उल्लेखिलेलीं माणसें महत्त्वाचीं व नवीं आहेत. तसेंच कांहीं हिशोबांतील रकमा फार मोठ्या असून मांडण्याची पद्धतही विचारणीय आहे. दफ्तरांतील कागद पैशाच्या व्यवहाराचेच फार आहेत, यांत शंका नाहीं; पण ते व्यवहार कोणत्या काळीं कोणत्या व्यक्तींशीं व किती मोठ्या रकमांचे आहेत हें पाहिलें असतां कागदांचें ऐतिहासिक महत्त्व कळून येणार आहे. या कागदांत येणारे कित्येक शब्द अपरिचित आहेत; त्यांचे अर्थ देण्याचाही प्रयत्न केला आहे. हजारों रुपयांची देवघेव करणारे लोक किरकोळ रकमांचे जमाखर्च किती बारकाव्यानें ठेवीत हें कळण्यासाठीं कांहीं किरकोळ हिशोबांची निवड केली आहे.

३ कागद वाचावयास सुरुवात करण्यापूर्वीं कांहीं गोष्टींचा खुलासा करणें जरूर आहे. 'अखंडित लक्ष्मी अलंकृत' या पूर्वीं येणारे लपेटीदार अक्षर 'छ' या अक्षरानें दाखविलें आहे. शिक्के व मुद्रा पहिल्या खंडांत जशा छापल्या आहेत तशाच यांत छापिल्या आहेत. पत्राच्या डोक्यावर उजवे अंगास पत्राची तारीख व मिति

दिली आहे; पण हिशोबी पत्रांत मात्र आरंभीं दिलेली तारीख न देतां देवघेवीच्या व्यवहाराच्या आरंभाची जमाखर्चांतील तारीख दिली आहे. उद्देश इतकाच कीं, ज्यांचे हिशोब छापिले आहेत त्यांचा वैद्य घराण्याशीं किती जुना पुराणा संबंध होता हें लक्षांत यावें. यामुळें नानासो यांच्या कारकीर्दीत संपविलेल्या व्यवहाराचे, कांहीं कागद या खंडांत छापिले गेले आहेत. + अशा फुलीपुढील मजकूर लेखकाची स्वाक्षरी समजावी. प्रस्तावनेंत ज्या वैद्य घराण्यांतील ऐतिहासिक पुरुषांचा उल्लेख आला आहे त्यांच्या पुढें कंसांत दिलेला आंकडा वंशावळींतील पिढी दाखविणारा आहे. पत्रांतील मजकूर फाटला किंवा लागला नाहीं तर × अशी फुली केली आहे. कागदाबद्दल या प्रस्तावनेंत लिहिलेला मजकूर अगोदर वाचल्या खेरीज कागदांचें महत्त्व व संबंध कळणार नाहींत. म्हणून प्रस्तावनेंत आलेल्या कागदांच्या अनुक्रमाप्रमाणें कागद वाचण्याबद्दल वाचकांस सूचना देत आहें. शिक्का हा शब्द मी पत्राचे आरंभीं केलेलेल्या ठशास वापरला आहे. पत्राचे शेवटचे ठशास मुद्रा शब्दच वापरला आहे. व्यक्तिसूचि व स्थलसूचि ह्या रा. कृष्णाजी विनायक पेंडसे यांनीं तयार करून दिल्या आहेत. व्यक्तींच्या नांवाची नेहमीं सूचि देतात व आडनांव कळलें असेल तर नांवाच्या शेवटीं लिहितात. आडनांवांची सूचि कोणी देत नाहींत, पण ती अडचण पुष्कळ वेळां भासते, म्हणून ती दूर करण्यासाठीं आडनांवेंही सूचींत घातलीं आहेत. यामुळें प्रत्येक नांव दोनदां यावें लागलें आहे. पत्र नं. ७८ पर्यंत छापण्याचें काम झाल्यावर आणखी दहा कागद सांपडले. त्यांस नं. ७९ पासून पुढें नंबर द्यावे लागले, यामुळें कांहीं कागदास त्यांच्या तारखा १७४० पूर्वींच्या द्याव्या लागल्या. हिशोबांतील कांहीं रकमांतील आणे पै रेघांत दिलेले असतात. आडव्या रेघेंत दिलेले आणे लिहिल्यावर त्यांच्या दोन्ही बाजूस टिंबें दिलेलीं असतात. त्याचा उद्देश काय ? उ. ·॥÷ एका आण्याचे वर खालीं टिंबें आहेत. हीं नेहमीच असतात असें नाहीं. अस्सल कागद वाचतांना एक गोष्ट विशेष दिसून येते ती अशी कीं, मजकुरांत कांहीं शोध घालावयाचा तर तो ओळीवर लिहिलेला असतो. पण हा शोध कोणत्या शब्दानंतर आहे हें समजण्यास आपण अलीकडे काकपदाचा उपयोग करतो तसा करीत नसल्यामुळें तो शोध संदर्भानेंच लावावा लागतो.

४ कागदांची वर्गवारी खालीं दिल्याप्रमाणें आहे:— ( १ ) सनदा, ( २ ) ताकिदी किंवा आज्ञापत्रें, ( ३ ) मेस्तक, ( ४ ) जाबसाली पत्रें, ( ५ ) याद्या, ( ६ ) कर्जरोखे ( ७ ) प्रामिसरी नोटा, ( ८ ) कर्जफेड व पावत्या ( ९ ) जामीन कदबे, ( १० ) सिलकबंद, ( ११ ) हिशोब.

## ( १ ) सनदा

पत्र नं. १।२।३ या सनदा **सप्रे** यास दिलेल्या आमच्या दफ्तरांत मिळाल्या आहेत. या शिवकालीन आहेत. त्यांतील फारसी शब्दांचे अर्थ देण्याचा प्रयत्न केला आहे. सप्रे हें कऱ्हाडे घराणें असून विद्वान् होतें. त्यांच्या वंशजाचे आणखी कागद नानासाहेब यांच्या कारकीर्दींतील सांपडले आहेत. **वाईस** गंगापुरींत एक सप्रे घराणें आहे, त्यांचा वैद्य घराण्याशीं पूर्वापार निकट संबंध होता असें दिसतें. पत्र नं. ११ **वैद्यांना** शाहू महाराजांनीं कोंकणांतील ४ गांवांत मिळून १५ बिघे जमीन इनाम दिली, त्याबाा सनद आहे. ब्रिटिश अमदानींत अशा किरकोळ जमिनींच्या इनामाबद्दल चौकशी होऊन या अमुकच जमिनी असें दाखवितां येत नसल्यामुळें त्या ऐवजी 'इतलाख इनाम' या नांवानें नक्त नेमणुकीच्या वंशपरंपरेच्या सनदा चालू अमदानींत देण्यांत आल्या आहेत. अशी नक्त नेमणूक अजून **वैद्य** घराण्यांत चालू आहे.

## ( २ ) ताकीदी किंवा आज्ञापत्रें

पत्रें:-पत्र नं. ५ रा. वासुदेवराव मुंडले यांनीं दिलेल्या **खंडकर** घराण्याच्या कागदांपैकीं आहे. शाहुमहाराजांच्या आज्ञेवरून परशुराम त्र्यंबक प्रतिनिधींनीं दाभोळ प्रांताचा कारकून गोपाळ रामचंद्र यास खंडकराकडे उत्पन्न चालू ठेवण्याबाा हें ताकीदपत्र आहे. वै. द. खंड १ मध्यें खंडकरांचीं ८ पत्रें छापिलीं आहेत. त्यांसंबंधाचेंच

हें पत्र आहे. पूर्वीच्या सनदांतून देशपांडेपण या ऐवजी देशकुलकर्ण हा शब्द वापरीत हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे. पत्र नं. १६ व १८ ह्या पुरवण्या कचरे व वरवडे येथील **खोती** अनुक्रमें रघुनाथभट वैद्य व काणे यांची आहे, असें चौकशी करून ठरल्यामुळें भंडारी व ढापरें यांस दूर करून ती ज्याची त्यास चालविण्याबद्दल बाबाजी म्हसके हवालदार किल्ले जयगड यास कान्होजी आंगरे यांनीं हुकूमवजा लिहिल्या आहेत. म्हसके घराणें पराक्रमी होतें. बावाजी हा जंजिऱ्याच्या सिद्दीवरील स्वारींत महाराजांतर्फे अंजनवेल व विजयगड काबीज करण्यासाठीं लढत होता. (पे. द. ३३·२१९ पहा.) वै. द. खं. १·२५ मध्यें कचऱ्याची खोती वैद्यांची असल्याबाा महाराजांचें आज्ञापत्र दिलें आहे. पत्र नं. ५६ **महादाजी गदाधर** अमात्यांनीं केशव मल्हार यास लासुर्णे गावची कमाविशी विश्वनाथभटास दिल्याबद्दल आहे. या महादाजीबद्दल माहिती वै. द. खंड १ च्या प्रस्तावनेंत दिली आहे. हा रामचंद्र नीलकंठाचा संबंधीं नव्हे. महादाजी गदाधर यास राजाराम महाराज चंदीस असतांना दक्षिणेंत १६९२ मध्यें सुमंत नेमले होते. राजाराम वारल्यावर हा ताराबाईच्या बाजूचा होता, असें दिसून आल्यामुळें त्यास शाहूनीं १७१० मध्यें काढून टाकलें व तें पद आनंदराव भोपळे यांस दिलें व तें पेशवाई अखेर त्याच घराण्याकडे होतें. हणमंते घराण्याकडे हें पद पुनः आलें नाहीं. गदाधर मल्हार यास १७०८।९ मध्यें शाहू महाराजांनीं प्रतिनिधि नेमलें होतें. याचें नाव हणमंते का काशीकर समजत नाहीं. यावेळीं परशुराम त्रिंबक प्रतिनिधीस कैदेंत टाकिलें होतें. ते २॥ वर्षांनीं सुटल्यावर प्रतिनिधिपदावर आले. त्यानंतर थोड्याच दिवसांत गदाधरभट वारला. पुढें पुनः परशुराम त्रिंबक यास १७११ सालीं कैदेंत टाकलें, तेव्हां गदाधरभटाचा भाऊ नारायण प्रल्हाद हणमंते यास १७११।१२ सालीं प्रतिनिधिपदावर नेमिलें. ते १७१३ सालीं वारले. त्यानंतर बाबूराव हणमंते प्रतिनिधि झाले ते त्याच सालीं वारले. ही माहिती भिडेकृत 'अष्टप्रधानाचा इतिहास' या पुस्तकांत आहे. बाबूराव वारल्यावर प्रतिनिधिपद पुनः परशुराम त्र्यंबक यांजकडे आलें. तें शेवटपर्यंत त्याच घराण्यांत राहिलें. याच वेळीं पत्रांत दिलेल्या महादाजी गदाधरास अमात्यपद मिळालें असा उल्लेख आहे. आतां या अमात्याची ऊर्फ प्रतिनिधींची वंशावळ पे. द. ४४ पान ८२ वर दिली आहे. त्यांत या अमात्यास त्र्यंबकचा काशीकर म्हणून म्हटलें आहे. हा उतारा पेशवे दफ्तरांतील कागदांमधील आहे, पण त्याचा खुलासा स्पष्ट केलेला नाहीं; रा. भिडे यांनीं अष्टप्रधानांच्या इतिहासांत दिलेल्या माहितीशीं हा खुलासा ताडून पाहतां हा हणमंते होता कीं काय अशी शंका उत्पन्न होते. याबद्दल संशोधन होणें जरूर आहे. विसंगतता न राहील असा खुलासा झाला पाहिजे. हें लिहिण्याचा उद्देश रा. ब. सरदेसाई यांची माहिती चुकीची म्हणावयाची असा मुळींच नाहीं, त्यांना दफ्तरांत मिळालेली माहिती त्यांनीं प्रसिद्ध केली आहे. ती संशोधनास उपयोगी पडणारीच आहे. कैफियतींतील वंशावळींचा उपयोग सावधगिरीनेंच केला पाहिजे. पत्र नं. ७८ मधील व्यंकटराव गंगाधर हणमंते याबद्दल जाबसाली पत्राखालीं हणमंते घराण्याबद्दल जास्त माहिती दिली आहे ती अवश्य वाचावी. साताऱ्यास फुटक्या तळ्याच्या वरचे बाजूस नातूंच्या वाड्यासमोर सुमंतांचा मोठा वाडा होता, तो पडला आहे. ती जागा मढ्यांचे काळे यांनीं विकत घेतली आहे असें कळतें. तो वाडा बहुधा भोपळ्यांचा असावा. पत्र नं. ८५ व ८८ हीं ताकीद पत्रें आपाजी सोमवंशी यास **सरलस्कर** नेमल्यानंतर निघालेलीं असावीं. बहाळ हा सोमवंशीना दिलेल्या महालांपैकीं एक आहे ( पे. द. ७.२० पाहा.) यासंबंधीं वै.द. खंड १.५९ वाचलें असतां जास्त खुलासा होईल. वोझर व सुकेणें हें गांव दाभाड्याकडे पूर्वी असावे. ते त्यांजकडून काढून माधवराव हिंदुराव सोमवंशी यास देण्याबद्दल एक ताकीद पेशव्यास दिली आहे. शाहू महाराजांनीं खंडेराव दाभाड्यानें देवजी सोमवंशी हिंदुराव यास दिलेल्या गांवास उपद्रव करूं नये असें ताकीदपत्र १४–१०–१७२८ रोजीं दिल्याचें पे. द. ३१.१२७ मध्यें आहे. पण त्यांत या गांवांचा उल्लेख नाहीं. खंडेराव हा सेनाखासखेल होता. पत्र नं. ८८ मधील ताकीद यशवंतराव दाभाड्याबद्दल असावी. त्यास सन १७३१ मध्यें सेनापतीचीं वस्त्रें मिळालीं. पत्र नं. ८५ हा महाराजांनीं बाजीरावास काढावयाच्या हुकुमाचा मसुदा आहे. जाबसालीं पत्रासंबंधानें माहिती देतांना सोमवंशी घराण्याची शक्य ती विस्तृत माहिती दिली आहे.

## ( ३ ) मेस्तक

पत्र नं. ११ हें एक मेस्तक **सचिवांच्या** जमाखर्चाच्या बाबींचें आहे. कै. राजवाडे यांनीं कांहीं मेस्तकें छापलीं आहेत. त्यांत हें किंवा अशा तऱ्हेचें मेस्तक मला आढळलें नाहीं. याचा पूर्ण अर्थ तज्ज्ञांनीं लावणें जरूर आहे. पुष्कळ संस्थानिक आपला खाजगी खर्च फार घेतात अशी तक्रार आहे. त्यांना त्यांच्या दफ्तरांत त्यांच्या संस्थानापुरतें मेस्तक सांपडण्याचा संभव आहे. पूर्वजांचा खाजगी खर्च त्यांत सांपडेल व त्यांपैकीं जो करण्याची आतां जरूरीच राहिली नाहीं तो खर्च कमी करण्यास काय हरकत आहे ? संस्थान प्रजेकरितां आहे ही भावना ठेवल्यास खर्चात पुष्कळ बचत होऊं शकेल. सध्यांच्या संस्थानिकांचें कारभाराचें धोरण वरिष्ठ सरकारच्या कारभाराप्रमाणें असणें जरूर आहे. वरिष्ठ सरकार प्रजेकरतां आहे, तर संस्थानिकांनींही प्रजेकरतांच आपण संस्थान चालवितों असें कृतींनीं दाखविलें पाहिजे. सचिवांचे घराण्यांत सचिवपद प्रथमतः धारण करणारे पूर्वज शंकराजी नारायण होत. रामचंद्र निळकंठ अमात्य यांच्या लस्करांत हे प्रथमतः संभाजीच्या कारकीर्दींत शिरले. पण रामचंद्रपंतच त्यावेळीं संभाजीच्या प्रेमांत नसल्यामुळें त्यांस कांहीं करतां आलें नाहीं. राजारामाच्या कारकीर्दींत जेव्हां सर्वाधिकार रामचंद्रपंताकडे आला, तेव्हां शंकराजी नारायण यास आपलें शौर्य दाखविण्यास वाव मिळून त्यांनीं घोरपडीवर चढून मोगलांकडून राजगड किल्ला घेतला; रामचंद्रपंतास वाई परगणा घेण्यास त्यांनीं मदत केली. त्यामुळें त्यास १६९७ मध्यें रामचंद्रपंतानीं महाराजांकडून सचिवपद दिलें. त्याजकडे त्यावेळीं ८ प्रांत व ११ किल्ले देण्यांत आले. शिवाय सर्व दक्षिण कर्नाटक व कोकण यांमधील राजाराम महाराजांच्या स्वराज्य व मोगलाई मुलुखांतील साहोत्र्याचें वतन दिलें. यांत ५०० तालुके होते. त्यांची साहोत्र्याची जमा सुमारें १॥ लक्ष होती. यावेळींच त्यास रोहिडेखोऱ्याचे देशपांडेपणाचें व फूट इनामांचें वतन देण्यांत आलें, असा भिडेकृत अष्टप्रधानांच्या इतिहासांत उल्लेख पान १८१।८२ वर आहे. यावरून सचिवांना साहोत्र्याचा अमल फार पुरातन काळापासून मिळत होता असें दिसून येतें. शंकराजी नारायणास मिळालेला अमल नारो शंकराकडे आला व तोच चिमणाजी नारायण यास सुरू ठेवण्यासाठीं महाराजांनीं सनदा दिल्या असें दिसतें. वै. द. खंड १.२८ मध्यें खानदेशांतील साहोत्र्याचें वतन चिमणाजी नारायणाकडे केव्हां व कसें आलें हें दिलें आहे. त्यावरूनही वरील गोष्टीस पुष्टी मिळते. हें मेस्तक २०० वर्षांपूर्वींचें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्यांतील तपशिलांत जमेचे मुख्य दोन प्रकार दिले आहेत. १ ऐन जमा व २ हासील आमल. ऐन जमेच्या पोटांत जिल्हे रुजू, खाजगत, सरदेशमुखी, व हुजूरचे गावमोकासे अशा ४ बाबी घातल्या आहेत. या बाबींचा खुलासा करतांना 'खासगत' याच्या पोटांत ४ बाबी दिल्या आहेत. त्यांपैकीं वतनी ऐवज एक बाब असून त्यांत साहोत्रा, हक्क देशपांडे तर्फ रोहिडे-खोरें व आमल देशमुखी तर्फ कसबे मावळ, यांचा समावेश केला आहे. साहोत्रा याचा अर्थ वै.द. खंड १-२८ च्या टिपेंत दिला आहे. शाहू महाराजांना जो वसुलाचा ¼ हिस्सा म्हणजे चौथाई मिळत असे, त्यांतला शेंकडा, ६ वा भाग म्हणजे साहोत्रा अमल सचिवांना देण्यात आला होता. याशिवाय शेंकडा ६६ ऐन मोकासा संस्थानिकांस, शेंकडा ३ नाडगौडास, व शेंकडा २५ महाराजांना, प्रतिनिधि वसूल करून देत. संस्थानिकांना लष्करी कामासाठीं हा तनखा पूर्वींच्या राज्यांत दिला जात असे. हा राजकीय सरंजाम होय. हा नोकरी बरोबर बजावली नाहीं म्हणजे त्या-वेळचें सरकार बंद करूं शके. साहोत्रा ही बाब जरी मेस्तकांत 'खाजगत' खालीं घातली आहे तरी ती ऐन जमेंत धरली आहे. हासील म्हणजे शिवाय जमा या खालीं ती घातलेली नाहीं. ही सर्व जमा संस्थानिकांनी कशी खर्च करावयाची याची फोड या मेस्तकांत केली आहे. ऐन खर्चात कायमच्या खर्चाच्या बाबी दिल्या आहेत. राजमंडळाच्या पोटांत 'खाजगत राजश्री स्वामी' अशी' बाब आहे. ही महाराज छत्रपतींकडे भरावयाची असते. तिचाही अर्थ त्यांत कोणतें खर्च येतात तें देऊन स्पष्ट केला आहे. मग सचिवांना खाजगी खर्च कशां-तून दिला आहे असा प्रश्न उपस्थित होतो. तो खर्च सरफे अमल म्हणून ऐन खर्चाशिवाय बाब दिली आहे. त्यां-तून भागवावयाच्या असतो. 'सरफे' म्हणजे राजाच्या खासखर्चाचें सदर; तो अगदीं शेवटीं दिला आहे. सध्यां पंतसाहेब साहोत्र्याचे पैसे ऐन जमेंत न घालतां खाजगी खर्चासाठीं आपल्याकडे ठेवितात. शिवाय दरबारच्या

जमेंतून निराळी रक्कम खाजगी खर्चासाठीं घेतात, ही गोष्ट या मेस्तकांत घालून दिलेल्या निरखाचे विरुद्ध दिसते. मेस्तकांतील पुष्कळ शब्द प्रचारांत नाहींत. ' रस्तखाना ' म्हणजे सरकारी कचेरी ' कमाविस तकसीम ' म्हणजे वसुलांतील वांटा किंवा हिस्सा. ' तहवेल ' म्हणजे १८ कारखान्याचे खर्चाचें सदर, ' शाहिरू ' म्हणजे नोकरांचे पगार व किरकोळ खर्च, ' कर्ज आमदान ' म्हणजे कर्जाची वसुली, ' कर्ज दादन ' म्हणजे कर्ज देणें, ' मुजाफती ' म्हणजे देणग्या, बक्षिसें. आणखी कांहीं शब्दांचे अर्थ मलाही निश्चित लावतां आले नाहींत. या मेस्तकाबद्दल माहिती देतांना एक गोष्ट प्रामुख्यानें सांगावीशी वाटते. अष्ट प्रधानांचा इतिहास लिहिणारे विष्णु गोपाळ भिडे हे सचिवांचे चिटणीस होते. त्यांनीं पुस्तकांतील पान १७८ मध्यें पुढील माहिती दिली आहे. ती पंतसाहेबांस अभिमान वाटण्याजोगी आहे. "त्या रामचंद्रपंताचे लस्करांत शंकराजी नारायण यांणीं सह्याद्री बांधोरी मावळ मुऱ्यांत राहून धनगर, मावळे, कंक, मालुसरे लोक व त्यांचे सरदार ( शिवाजीचे वेळचे ) जमवून मोंगलांच्या फौजा माराव्या, रसदा लुटाव्या, छापे घालावे आणि किल्ले व मुलूख घ्यावे असें करूं लागले " याच्याच पुढें शंकराजी नारायण घोरपड लावून रायगड किल्यावर मावळ्यांसह गेले व किल्ला घेतला ही हकीकत दिली आहे. हें वाचून तरी या सचिव महाशयांनीं संस्थानांतील मावळे व धनगर यांच्या पूर्वजांच्या अप्रतिम सहाय्यामुळें व पराक्रमामुळें आपल्या पूर्वजांनीं मराठी राज्य राखिलें, हें लक्षांत घेऊन या गरीब रयतेकडून गुरचरण व धनगर महालपट्टी वसूल करण्याचें सोडून देण्यास व साहोत्रा अमल गरीब रयतेसाठीं खर्च करण्यास काय हरकत आहे ?

## ( ४ ) जाबसालीं पत्रें

यांतील नं. ४ चें पत्र हें संस्कृत **अष्टक** असून तें **बाळशास्त्री रानडे** यांनीं रामचंद्रपंत अमात्यांना उद्देशून लिहिलें आहे. त्याचा अर्थ थोडक्यांत इतकाच आहे कीं, या अमात्यांनीं राष्ट्रभंगसमय आला असतां आपला देश वांचविला. त्यांना वैराज ( वाई ) क्षेत्रस्थांची विनंती कीं, या क्षेत्रांत १०० ब्राह्मणांस निरंतर अन्न मिळेल अशा तऱ्हेचें अन्नसत्र सुरू करावें. यांत शेवटीं क्षेत्राचें वर्णन दोन कवितांत दिलें आहे. ज्या रामचंद्रपंत अमात्यांनीं राजारामाचे कारकीर्दीत व शाहू महाराज गादीवर येईपर्यंत आपलें राष्ट्र मोगलांच्या तडाख्यांतून वांचविलें. त्यांस उद्देशून हें अष्टक असावें, असें मला वाटतें. पण याबद्दल प्रो. पोतदार हे याचा निराळा अर्थ लावूं पहातात. त्यांना अष्टकाची आगाऊ एक प्रत दिलेली आहे. त्याबद्दल विचार करून त्यांस निश्चित मत देण्यास अजून सवड झाली नसेल. प्रो. गोडे यांनींही हें अष्टक वाचून माझा अर्थ शक्य दिसतो असें मत दिलें आहे. माझ्या अर्थाला एक अडचण अशी दिसून आली कीं, रामचंद्रपंत अमात्यांना बाजिसूनु असें म्हटलें आहे. पण रामचंद्राच्या वडिलाचें नांव नीलकंठ आहे. भोरचे विष्णु गोपाळ भिडे यांनीं १८६६ सालीं ' सातारचे श्रीमंत छत्रपति शिवाजी महाराज यांचे वंशाचा व प्रतिनिधि आणि अष्टप्रधान यांचा इतिहास' हें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे, त्यांत पान २१६ वर खालील मजकूर आहे "शके १५६६ सन १६४४ चे वर्षी शिवाजी महाराजांनीं कोंकणांत तळे, घोसाळे हे किल्ले घेतले. त्याजबरोबर सोनोपंताचा मुलगा निळो सोनदेव होता. त्यानें फार मर्दुमकी केली व पुरंदर किल्ला घेतला म्हणून शिवाजींनीं शके १५६९ सन १६४७ इसवीचे सुमारास बाळकृष्णपंत याजकडून मुजुमदारीचा दरक काढून तें पद **निळो सोनदेव** ऊर्फ **आबाजी सोनदेव** यास दिलें." यावरून निळोपंतास आबाजीही म्हणत असें उघड होत आहे. तेव्हां आबाजींच्या मुलाला ' बाजिज ' म्हणण्यांत रानड्यांनीं चूक केली असें म्हणतां येत नाहीं. रामचंद्रपंतांचें आडनांव बहुतकर होतें असें भिडे म्हणतात. त्यास भादाणेकरही म्हटल्याचा उल्लेख सांपडतो. महाशब्दे व रानडे हीं वाईचीं विद्वान् कुटुंबें उत्तर हिंदुस्थानांत गेलीं होतीं असें प्रो. गोडे यांनीं जयपुरासंबंधीं लिहिलेल्या निबंधांत दिलें आहे. पण त्यांनी दिलेल्या रानड्यांच्या वंशावळींत बाळशास्त्री कोठें नाहींत. तसेंच सध्यां रा. मोरोपंत खरे यांनीं रानडे कुल वृत्तांतासाठीं जमा केलेल्या वंशावळींतही त्यांस कोठें लावतां येत नाहीं. वाईंत गंगापुरींत बाळंभटजी रानड्यांचें घर आहे. ते विद्वान्, वैदिक व शास्त्री घराणें प्रसिद्ध आहे. कै. वे. शा. सं. भाऊ शास्त्री लेलेही बाळंभटजींना बहुमान देत असत. यांचा कुटुंबविस्तार मोठा आहे.

त्यांची मंडळी पोटामागें वाई सोडून गेलेली आहेत. त्यांच्याजवळ रानडे घराण्याची विस्तृत वंशावळ असण्याचा संभव आहे. आतां मी लावलेल्या अर्थास पुष्टिकारक आधार श्रीवाईक्षेत्रवर्णन या पुस्तकांत सांपडला आहे. वाईच्या बाळशास्त्र्यांना रामचंद्रपंत अमात्याबद्दल असें अष्टक तयार करण्याची बुद्धि कां व्हावी ? त्याचें समर्पक कारण असें दिसतें कीं, वाई हा प्रांत मोगलांच्या ताब्यांत गेला असतांना रामचंद्रपंत अमात्यांनीं सोडविला, असा इतिहास आहे. सन १६५९ सालीं अफझुलखानाचा वध प्रतापगडीं केल्यावर शिवाजी महाराजांच्या ताब्यांत हें क्षेत्र आलें. त्यापूर्वी तें विजापूरच्या मुकासदाराचें राहण्याचें ठिकाण होतें. अफजुलखानाच्या लष्कराचा तळ वाईसच होता. १६८७ मध्यें शिरजेखानानें वाईवर हल्ला केला होता तो हंबीरराव मोहित्यांनीं त्याचा पराभव करून परतविला. राजारामाचे कारकीर्दींत १६९० मध्यें मोंगलानीं पुनः हें शहर हस्तगत करून घेतलें. पण संताजी घोरपडे ( कापशीचे ) यांनीं त्यांशीं झगडून वाई परत घेतली. रामचंद्रपंत अमात्यांनीं सुचविलेल्या युक्तीनें वाईचे फौजदारावर छापा घातला त्यांनीं त्याला कैद केलें व तेथें आपलें ठाणें बसवून आपला कारकून शंकराजी नारायण (सचिवांचा पूर्वज) यांचे ताब्यांत तें दिलें. असा रामचंद्रपंताचा संबंध वाईशीं आलेला आहे. ही गोष्ट बाळशास्त्र्यांस पूर्ण ठाऊक असल्याखेरीज रामचंद्रपंतास वाईक्षेत्रीं अन्नसत्र सुरू करण्याबद्दल विनंती करण्याची प्रेरणा कशी उत्पन्न होईल ! रामचंद्रपंतांचे चिरंजीव भगवंतराव बाळंभट व विश्वनाथभट (४) वैद्य यांस एका पत्रांत तुमच्या आमच्या घराण्याचा पूर्वापार संबंध होता असें लिहितात. यावरून अमात्य व वैद्य या घराण्यांचा एकमेकांशीं पूर्वापार संबंध निकटचा होता असें स्पष्ट होतें. शाहूमहाराज दक्षिणेंत आल्यावर हें पद बाळकृष्णपंत हणमंते व महादाजी गदाधर यांजला दिलें होतें. भगवंतरावास तें पद द्यावयास पाहिजे होतें. रामराजास गादीवर बसविण्याच्या कामीं शाहूमहाराजांस भगवंतरावाची मोठी मदत झाली होती, व तें पद व सरंजाम मिळविण्यासाठीं त्याची खटपट ही फार शिकस्तीची वैद्यबंधूं मार्फत चालली होती. या संबंधाचीं पत्रें आमचे दफतरांत वैद्यबंधूंस व शाहूमहाराजास भगवंतरावानें लिहिलेलीं पुष्कळ आहेत. इतका पूर्वापार दोन्ही घराण्यांचा संबंध असल्यामुळेंच हें अष्टक आमच्या दफतरांत सांपडलें आहे. या अष्टकाची निश्चित शर्कामिर्ति लावण्यास साधन नाहीं. पत्राचा काल १७०० ते १७०८ च्या दरम्यान मी लावला आहे. तो कदाचित् १६९० ते १७०० पर्यंतचाही असूं शकेल. याबद्दल संशोधन होणें जरूर आहे. प्रो. पोतदार यांचें म्हणणें कीं, हें अष्टक सवाई जयसिंगाच्या कारकीर्दींतील असण्याचा संभव आहे. पण जयसिंगाच्या सल्लागारांत कोणी रामचंद्र बाजिराव होता व त्याचा वाईक्षेत्रांशीं निकटसंबंध होता हें शाबीत होईपर्यंत माझाच अर्थ बरोबर धरावा लागेल. शेवटच्या दोन कवितांत दिलेलें वर्णन जुन्या वाईचें आहे. सध्यांच्या कृष्णेच्या पुलाच्या वरील भाग म्हणजे गंगापुरी, मधली आळी, गणपती आळी व धर्मपुरी यांतील वस्ति नव्या वाईची आहे. नवी वाई वसण्यापूर्वी सिद्धेश्वराचें देवालय वाईच्या पश्चिमेसच होतें व आतां तें नव्या वाईच्या दक्षिणेस आहे. भद्रेश्वरचें देवालय अजूनही वाईच्या पूर्वेस आहे. विश्वनाथाचें देवालय मध्यभागीं दिलें आहे. तें रास्त्यांचें काशीविश्वेश्वराचें देवालय नसून ब्राह्मणशाईंतील काशीविश्वेश्वराचें जुनें देवालय असावें. (आपटेकृत श्री क्षेत्र–वाईवर्णन पहा). पत्र नं. ६ हें येकच पत्र १७४० पूर्वी **रघुनाथ भट वैद्य** ( ३ ) यांनीं लिहिलेलें आमच्या दप्तरांत मिळालें आहे. हें अगदीं झिरझिरीत भोकें पडलेलें आहे. हें त्यांनीं बाळंभट व विश्वनाथभट(४) यांस लिहिलेलें असल्यामुळे त्याची पुष्कळ चिकित्सा करावी लागली. या पत्राची मिति वैशाख व. ७ भौमवार ( मंगळवार ) दिलेली आहे. यामुळें जंत्रीवरून १७१५।१७२० हीच तारीख संभवनीय वाटली. या पत्रांत लक्ष्मीबाई वैशंपायन या बाईकडून आलेल्या पैशाचा उल्लेख आहे. ही नांदिवड्यास राहत होती. या बाईशीं वैद्यांचा देवघेवीचा व्यवहार होता असें तिचा हिशोब पत्र नं. ५३ व गोपाळभट पुराणिक यांची पावती पत्र नं. ६१ यांवरून स्पष्ट होतें. पत्र नं ५३ मध्यें रामचंद्र गोपाळ यास तिनें तीर्थरूप म्हटलें आहे तेव्हां हे तिचे वडील असण्याचा संभव आहे. डालेश्वरचें देवालय कोकणांत मौजे देहूड येथें वैद्यांनीं बांधलें होतें असा इतर पत्रांत उल्लेख आहे. त्याचें काम रघुनाथ भटांचे देखरेखीखालीं सुरू झालें असावें. सदाशिव भट कोण हें सांगतां येत नाहीं. तो वैद्यच असावा असें लावगनकर वैद्यांच्या वंशावळीवरून वाटतें. रामचंद्रपंत हा वैद्यांचा दिवाण रामचंद्र गोपाळ करकरे असावा.

विश्वनाथभट यावेळीं लहान म्हणजे सुमारें २०।२५ वर्षांचे असावेत. कारण कोकणांतून परत गेल्यावर ते सुखरूप पोंचले किंवा नाहीं याबद्दल वडील चौकशी करीत आहेत. स्वतःचे खीस सातान्यास पाठविण्याचा रघुनाथ भटांचा बेत होता. यावरून त्यांचे चिरंजीव त्या वेळीं कायमचे सातान्यासच राहत असावे त्यानंतर वाईंत वस्ती केलेली दिसते. राघोबा नाईक हा नांदिवड्याचा दरवे आडनांवाचा गृहस्थ वैद्यांशीं पुष्कळ देवघेवीचा व्यवहार करणारा होता, असें त्याचें इतर पत्रांवरून दिसून येत आहे. चि. सौ. सरस्वती ही बाळंभटाची बायको असून तिला कोकणांत बोलावलें होतें. इटेच्या कामाचा उल्लेख डालेश्वराच्या देवळाचे बांधणीसंबंधीं आहे. 'खाले' या शब्दाचा अर्थ 'देशावरून खालीं म्हणजे कोकणांत' असा आहे. पत्र नं. १२ हें **त्रिंबक नारायण मंडलिकाचें** असून त्याची तारीख अदमासानेंच लाविली आहे. हें पत्र फार जुनें व फाटलेलें आहे. विश्वनाथ नारायण मंडलिकांच्या चरित्राचे जे भाग छापले गेले आहेत. त्यांवरून पत्रलेखकाचा त्या घराण्याशीं कसा संबंध येतो हें मला ठरवितां आलें नाहीं. पण त्यांचा साताऱ्याचे कृष्णाजी नाईक जोशी ( नानाजी नाईक बारामतीकरांचे पूर्वज ) व मुरूडचे दातार यांच्याशीं निकट संबंध दिसतो. कृष्णाजी नाईक जोशी यांची आई व त्रिंबकराव मंडलिकांची आई ह्या बहिणी असून त्यांचे माहेर मुरूडच्या दाताराकडे होतें. 'दातार' घराण्याचा कुलवृत्तांत लिहिण्याचें काम चालू आहे त्यास ही माहिती उपयोगी पडेल. भास्करभट वैद्य ( ४ ) यांचें घर साताऱ्यास असावें व तसें असणें शक्यही आहे. कारण ते शाहू महाराजांचें सल्लागार होते असें पे. द. भाग ३. ३३ व ३४ मध्यें छापलेल्या पत्रावरून स्पष्ट होत आहे. पत्र नं. ६ मधील मजकुराचाही यास दुजोरा मिळतो. ते स्वतः सिद्दीवरील स्वारींत गेलेले होते. मुंबईच्या मंडलिकांच्या जवळ विस्तृत वंशावळ असल्यास या पत्राचा जास्त उलगडा होऊं शकेल. पत्राच्या अक्षराचें वळण शिवकालीन पत्राप्रमाणें आहे. पत्र नं. ७ व ८ हीं २ पत्रें **त्र्यंबकराव गंगाधर हणमंते** यांनीं गणोबा नाईक कोलटकर यास पैसे देण्याबद्दल लिहिलीं आहेत. दुसरीं २ पत्रे त्यांच्याच पैशाबद्दल नं ९।१० हीं वैद्य बंधूंना आलेलीं आहेत. रा. श्रीधर शामराव हणमंते रेल्वे पेन्शनर यांनीं भा. इ. सं. मंडळाच्या ३० व्या संमेलनांत ३१।५।४३ रोजीं आपल्या घराण्यासंबंधीं ऐतिहासिक माहिती म्हणून एक निबंध वाचला. त्यांतील माहिती फक्त चिंचवड दफ्तरांतील मंडळांत असलेल्या कागदांतून रा. कृष्णराव पुरंदरे यांनीं या घराण्यासंबंधीं निवडलेले कागद व माझे दफ्तरांतून मी निवडलेले कागद यांच्या आधारेंच दिलेली दिसते. हें घराणें शिवकालीन असून यांत धर्मपरायण, पराक्रमी व राजनीतिकुशल माणसें निर्माण झालीं होतीं. शिवाजी महाराजांच्या बालपणीं जिजामातेच्या तैनातीस शिवनेरीस जी मंडळी ठेविली होती त्यांपैकीं नारो त्रिमल हणमंते हे एक होते. हे शहाजीचे विश्वासू नाकर होते. यांचा मुलगा रघुनाथ नारायण यास शिवाजीनें कर्नाटकच्या कामगिरीवर पाठविलें होतें. तेथें तो एकोजीचा कारभारीच होता. यानें धुंडिराज लक्ष्मण व्यास या पंडिताकडून 'राज्यव्यवहार' कोश तयार करवून संस्कृत भाषेंतील पर्याय शब्द प्रचारांत आणले. हा ग्रंथ त्यानें कर्नाटकच्या स्वारींत शिवाजीचे हवालीं केला. शिवाजीस व्यंकोजीनें ( एकोजीनें ) भाऊबंदकीचा वांटा देण्याचें नाकारल्यामुळें तें प्रकरण हातघाईवर आल्याचें दाखवून रघुनाथरावानें त्यावेळीं जी शिष्टाई केली ती अवर्णनीय होती व त्यामुळें दोघा भावांचें सख्य घडून आलें. त्याची हकीगत हृदयंगम व वाचनीय आहे ( म. रि. शिवाजी पान १८९ ते १९६ पहा ). शिवाजी महाराजांनीं अष्टप्रधानांच्या नेमणुका करून राज्यारोहण झाल्यावर त्या जाग्यांचे अधिकाऱ्यांना संस्कृत नांवें दिलीं. तेव्हां 'डबीर' या ऐवजीं 'सुमंत' शब्द वापरण्यास सुरुवात झाली. त्यावेळचे पहिले सुमंत १६७४ सालीं नेमलेले जनार्दन नारायण हाणमंते होत. संभाजीच्या कारभारांत मराठी राज्याची वृद्धि न होतां राज्यनाश होईल कीं काय असें वाटून रघुनाथ नारायणानें दक्षिणेंत येऊन महाराजांची बिरवाडीस गाठ घेतली व भर दरबारांत त्यांची कानउघाडणी केली. अर्थात् ही वृत्ति महाराजांस रुचली नाहीं, तथापि त्यांनीं त्यास अमात्यपद दिलें. ही भेट घेऊन परत जात असतांच तो वाटेंत मरण पावला ( म. रि. संभाजी पान ३४।३५ पहा ). जनार्दनपंतास संभाजीनें कैद करून रायगडीं ठेविले होतें. त्यास राजारामानें सोडून आपल्याबरोबर चंदीस नेलें होतें. त्यांची तिकडील कामगिरी समाधानकारक वाटल्यामुळें त्यास अमात्यपद सन १६९२ मध्यें

मिळालें. रामचंद्रपंत यास हुकमतपन्हा हा किताब दिला. जनार्दनपंतास गंगाधर व श्रीनिवास असे दोघे मुलगे होते ( म. रि. शिवाजी पान १६८ पाहा ). परंतु हणमंते यांचे कागदांत गंगाधर व रघुनाथ हे त्रिमल याचे मुलगे दिले आहेत. चिंचवडच्या देवांचे दफ्तरांत खालील पत्र सांपडतें.

श्रीशंकर

२० फेब्रुआरी १७३६

नकल

सकलतीर्थरूप श्रीदेव स्वामीचसेवेसीः—अपत्ये गंगाधर त्रिमल व रघुनाथ त्रिमल सां नमस्कार. विनंती उपरी. राक्षेस सवत्सर कार्तिक मास हप्ता रु. ३००० तीन हजार पैकीं दीड हजार पावले. फालगुण वद्य पचमी गुा रा केसो बलाळ, बहुत काये लिहिणें हे विनंती.

त्रिमलाचे हे दोघे मुलगे असल्याबद्दल आणखीं पत्रें चिंचवड दफ्तरांत आहेत. गंगाधर व श्रीनिवास हे जनार्दन नारायणाचे मुलगे असल्याचा उल्लेख आहे. ( म. रि. शिवाजी पान १९८ पहा ). चिंचवड दफ्तरांतील कागदांवरून चिंचवडच्या देवांचा व हणमंत्यांचा देवघेवीचा संबंध होता असें दिसून येतें. २१००० रु. हप्तेबंदीनें त्यांनीं हणमंत्यास देण्याचा एक करार कागदांत आहे. चिंचवडच्या मोरया देवस्थान वर यवनांची पूज्यबुद्धि होती म्हणूनच त्या देवास त्यांचेकडूनच उत्पन्न सुरू झालें व तें अजून चालत आहे. पूर्वी बाणेरें कर्यात मावळ हा गाव शहाजी महाराजांनीं नारो त्रिंमल हणमंते यास सन १६४९ सालीं इनाम दिला होता. त्याचा नातू तिमाजी रघुनाथ कर्नाटकांत राजारामाबरोबर गेला असतां तो गांव चिंचवडचे देवाकडे वहिवाटीस दिला होता; पण छत्रपतींनीं त्यांचेकडून काढून भुजबळराव सप्तहजारी यास जमावाचे बेगमीसाठीं दिला होता. तो अन्याय रामचंद्रपंत अमात्यांनीं दूर करून बाणेरें गांव तिमाजी रघुनाथ यास सन १६९९ मध्यें पुनः दिला. तो त्यांनीं श्रीदेवाकडे चालविण्याची आज्ञा केली. पुढें शाहू महाराजांनीं हणमंत्यांच्या विनंतिवरून देवाकडील गांव दूर करून गंगाधर त्रिमल यास इनाम करून दिला. पत्रांतील व्यंकटराव गंगाधर हा गंगाधर त्रिमलचा मुलगा नसून गंगाधर जनार्दनचा मुलगा असला पाहिजे. कारण गंगाधर त्रिमल यास १७३५ मध्यें गाव मिळाला आहे व हीं व्यंकटरावाचीं पत्रें १७२० मधील आहेत. **त्रिमल रघुनाथ** हा जनार्दन पंताचा पुतण्या होता. व्यंकटराव यांची वैद्याकडून पैसे नेल्याचीं व त्यास पैशाबद्दल तगादा केल्याचीं दफतरांत पुष्कळ पत्रें आहेत. शाहू महाराजांच्या कारकीर्दीत व पुढें, हणमंते हे सुमंत पदावर आल्याचें दिसत नाहीं. हें पद महादाजी गदाधर याजकडे १७०८ मध्यें असल्याचा उल्लेख आहे. पण तो ताराबाईकडे फितूर असल्याचा संशया आल्यावरून त्यास काढून महाराजांनीं सुमंतपदावर १७१० सालीं औरंगाबादचे रहिवासी आनंदराव रघुनाथ भोपळे यास नेमिले. पुढें भोपळे कुटुंबाकडेच ते शेवटपर्यंत चाललें होतें. सातान्यास फुटक्या तळ्याच्या वरचे बाजूस नातूच्या वाड्यासमोर सुमंतांचा वाडा होता. त्याची बखळ आतां मळ्यांचे काळे यांनीं घेतली आहे. हा वाडा भोपळ्यांचा असावा असें वाटतें. महादाजी गदाधर हणमंते, बाळकृष्ण ऊर्फ अबूराव हणमंते, अपाजी बाबूराव हणमंते हीं नांवें शाहूच्या अमदानींत आढळतात. पण हे सर्व अमात्यपदावर होते, सुमंतपदावर नव्हते. अमात्यपदही पुनः रामचंद्र नीलकंठ यांच्या वंशजाकडे रामराजाचे कारकीर्दीत १७५० सालीं गेलें. व्यंकटराव गंगाधर याची राजकीय कांहीं कामगिरी दिसून येत नाहीं. वैद्यांचे कर्ज बरेंच जुनें असावें. तें फेडण्यासाठीं सातान्याजवळील वेण्णानदी पलीकडील वरिये इनाम गांवचा वसूल हणमंत्यांनीं वैद्यास लाऊन दिला होता. कर्ज फिटेपर्यंत वैद्यांनीं व्यंकटरावाची सून अन्नपूर्णाबाई ( बळवंतरावाची स्त्री ) इला दरसाल रु. रु. १०० यावे व तिनें वैद्यांच्या वसुलीस हरकत करूं नये असे पंतप्रधानांनीं हुकूम सोडल्याचें कागद आहेत. पुढे हा गाव मोकला झाल्यावर **अन्नपूर्णा**बाईनें सायगावचे त्रिंबकभट बिन गणेशभट आपटे यांस गुरुस्थानीं मानलेल्या वासुदेव स्वामीच्या समाधीच्या पूजा नैवेद्यासाठीं देऊन टाकिला आहे. यासंबंधाचे कागद १८३५

साली झालेले आपटे यांजपाशीं आहेत. ते मी सातान्यास पंताचे गोटांत राहणाऱ्या आपट्याकडे पाहिले. त्रिंबकभटही स्वामींचे शिष्य होतेच. ही बाई १०० वर्षांहून जास्त जगली होती, असें कागदपत्रावरून दिसतें. श्रीवासुदेव स्वामींची पुण्यतिथि माघ शु. ६स अजूनही आपटे करीत असले पाहिजेत. समाधि वरिये गांवांत आहे. अन्नपूर्णाबाईस मूलबाळ नव्हतें म्हणून तिनें आपल्या मिळकतीचें व्यवस्थापत्र करून, ती धर्मार्थ देऊन टाकिल्याचे अस्सल कागद आपटे याजपाशीं आहेत. हणमंते घराणें नामशेष होण्याची वेळ आली, म्हणून ग. श्रीधर शामराव यांनीं रेल्वेंतील नोकरी सोडल्यावर आपलें मूळ आडनांव हणमंते लावण्यास सुरुवात केली व त्यांनीं आपल्या घराण्याची माहिती जमा करण्याबद्दल बरीच खटपट चालविली. त्याचें पर्यवसान त्यांनीं १९४३ सालीं मंडळा-पुढें वाचलेला निबंध होय. पेशवे, छत्रपति, भोसले हीं घराणीं नाममात्र राहिलीं आहेत तेव्हां हणमंते व त्यांच्या सारख्या पूर्वीच्या सरदारांचीं नांवें नाहींशीं झालीं तर त्यांत नवल काय! मेढे खोऱ्यांतील कण्हेर व अकलें हीं गांवें अजून हणमंत्याकडे इनाम आहेत. पण ते इनामदार हणमंते आडनांव लावीत नाहींत असें कळतें. प्रस्तुत पत्रांतील गणोबा नाईक कोलटकर व लक्ष्मण ना॥ केसकर हीं नांवें मोठ्या सावकारांचीं आहेत. गणोबा कोलटकर हा भास्कररामाचा पूर्वज किंवा जवळचा संबंधी होता कीं काय हें सांगतां येत नाहीं. पण एका पत्रांत गणोराम ना॥ कोलटकर असा उल्लेख आहे (पत्र नं. ५१ पहा) म्हणून हा भास्कररामाचा भाऊ होता कीं काय अशी शंका येते. कोलटकर कुलवृत्तांतात याचें नांव नाहीं. आमच्या दफ्तरांत याचीं हीं सर्वांत जुनीं पत्रें आहेत. याचा वैद्याबरोबर पैशाचा पुष्कळ देवघेवीचा व्यवहार झालेला आहे. वैद्यांचें सातान्यास एक कापडाचें दुकान होतें, त्यांत याची भागीदारी होती असें दिसतें. पत्र नं. ५१ हा दुकानाचा हिशेब आहे. पत्र नं. १३ हें पत्र **बाबूजी ना॥ जोशी** बारामतीकर यांच्या पूर्वजांनीं आपल्या चुलत भावास मिळकतीचें वांटणीपत्र झाल्यावर लिहलें आहे. केशव व विश्वनाथ हे रुद्र जोशांचे दोघे मुलगे होते. केशवास सदाशिव व कृष्णराव दोघे मुलगे होते. सदाशिवाचे चिरंजीव बाबूजी नाईक होत. विश्वनाथ रुद्रास अनंत हा एकच मुलगा होता. पण तो कोठें होता व त्याचा पुढें वंश वाढला किंवा नाहीं याची माहिती लागत नाहीं. सदाशिवाचा भाऊ कृष्णराव हा सातान्यास राहिला. त्यांचा शनिवारांत माचीला मोठा वाडा आहे व त्याचे वंशजही अजून हयात आहेत. वाटणीपत्रांत नजर चुकीनें एका मुद्याबद्दल खुलासा करण्याचें राहिलेलें होतें, त्यासंबंधीं शंका राहूं नये म्हणून अंताजीनें बंधूंस हें प्रामाणिकपणानें पत्र लिहून दिलें आहे, यावर ज्या साक्षी आहेत त्यांतील सर्व माणसें सावकारी पेशाचीं आहेत, हें त्यांच्या 'नाईक' या पदवीवरून दिसून येईल. शिवाय वैद्यांशीं झालेल्या पैशाच्या मोठ-मोठ्या व्यवहाराचे त्यांचे पुष्कळ कागद दफ्तरांत आहेत. या पत्रांत सदाशिव व कृष्णाजी यांस 'नाईक' म्हटलें आहे यावरून बाबूजी नाईकाचा सावकारीचा धंदा पूर्वापार होता असें म्हणावें लागतें. कृष्णाजी नाईकास शाहू महाराजांनीं गादीवर येतांच 'पोतदारी' दिलेली होती. 'पोतदारी' हा एक गांवच्या वसुलवार शेंकडा १ किंवा २ टक्के हक्क असे. पत्र नं. ४७ हें बाळंभटानीं वाईहून विश्वनाथभटास सातान्यास लिहिलेलें असावें. त्यांतील मजकूरावरून वैद्यबंधू पालखींतून प्रवास करीत, असें दिसतें. तिच्यासाठीं १० भोई लागत. त्यांना रोजमुरा देण्यांत वैद्यांची कसूर दिसून येते. **जीव जोशी** याचा नानासो यांच्या कारकीर्दीतील पत्रव्यवहारांत उल्लेख आहे. त्यास वर्षासन किती द्यावें; हें धाकट्या भावाच्या विचारानें ठरविलें जातें; हें बंधुप्रेमाचें एक द्योतक आहे. भास्करभट त्यास तिघा श्रीमान कुळांकडील पैका वसूल करण्याबद्दल सूचना देत आहेत. यांपैकीं न्यायाधीश हे **काशिनाथ अनंत असावे. नरसी सामराज** हा **मानाजी पवाराचा** दिवाण होता. **बाळाजी दादाजी** हा एक अंबेऱ्याच्या वैद्य घराण्यांतील असून तो विश्वनाथ भटाबरोबर होता. या पत्रांतील 'सेरा' या शब्दाचा अर्थ 'पोटगी', 'वेतन', असा आहे. **पत्र नं. ७४** हें अंबेऱ्याचे वैद्य **बाळाजी दादाजी** यांनीं वैद्यबंधूस लिहिलें आहे. **कृष्णाजी महादेव रानडे** ही एक नवीन व्यक्ति वैद्यांशीं संबंध येणारी यांत आहे. हे दोघेही वैद्यांच्या देवघेवीच्या वसुलीवर असावेत. **मल्हारराम धारपुरे** ह्याचा वै. द. खंड १·७ या पत्रांत उल्लेख आला असून, त्याची मोठ्या रकमांची देवघेव जगथाप, बाजीराव बल्लाळ वं कृष्णंभट नवाथे, यांजपाशीं झालेली आहे. वैद्यांनीं त्यास पुष्कळ पैसे अडीअडचणीला दिले असून ते पैसे कसें वसूल होतील, हें बाळाजी दादाजा यांनीं

या पत्रांत विस्तारानें कळविलें आहे. वै. द. खंड १. ३४, ३६ व ६४ मध्यें पंतप्रधानांच्या पत्रांचा उल्लेख आहे. अंबेऱ्याच्या वैद्याचें एक वंशज रा. **रघुनाथ विनायक वैद्य** एम्. ए. बी. टी. हे ग्वालेर येथें असतात. त्यांनीं मला १९३५ सालीं माझा केसरी पत्रांतील लेख वाचून अंबेऱ्याच्या वैद्यांची वंशावळ पाठवून दिलेली आहे. त्यावरून मी हें पत्र त्या वैद्यांचें म्हणतों. शिवाय बाळाजीचा मुलगा सदाशिव याचें नांव आमच्या शके १६८७ च्या खतावणींत ८ व्या पानावर आलें आहे. हा काल पहिले माधवरावाचे कारकीर्दींतील आहे. दुसरें नांव विनायक भट वैद्य अंबेरकर असें त्याच खतावणींत पान ६० वर आहे. बाळाजीचा भाऊ चिमणाजी याचे वंशज नाशिकास आहेत; त्या पैकींच रघुनाथ विनायक आहेत असें त्यांचें म्हणणें आहे. **पत्र नं. ७६** हें **संभाजी अंगरे** यांनीं स्वतः बाळंभट वैद्य (४) यास त्यांचे वडील बंधु भास्करबावा (४) वारल्यावर लिहिलें आहे. पत्रांतील मजकूर वाचून भास्करबावाबद्दल अंगऱ्यांचा किती आदर व विश्वास होता हें व्यक्त होतें. भास्करबावाप्रमाणें आमच्याशीं तुम्ही वागत जा, असें अंग्रे वैद्य बंधूंना सांगत आहेत. पत्र बाळबोध कां लिहिलें याचें कारण दिलें आहे. दसऱ्यास कलगी तयार करण्याकरतां मोतीं पाहिजे होतीं तीं वैद्य बंधूंकडून त्यांनीं मागविलीं आहेत, अशीं विश्वासाचीं कामें अंग्रे त्यांजवर सोपवीत असत. पत्राची तारीख दसऱ्याच्या उल्लेखावरून लावली आहे. पत्र **नं. ६६** हें भास्करबावांनीं (४) धाकट्या भावास पांघरुणें पाठविण्याबद्दल जरी लिहिलें आहे तरी त्यांतील कांहीं मजकूर महत्वाचा आहे. यांना घोड्यावर प्रवास करावा लागे, स्वारीस जावें लागे, म्हणून घोड्यांची निगा ठेवण्याबद्दल यांत सूचना दिली आहे. घरीं सावधपणें राहून दरबारचें वर्तमान कळविण्याबद्दल सुचविलें आहे. पत्र संपल्यावर बाळबोधींत मजकूर लिहिलेला आहे तो स्वदस्तुरचा आहे. त्यांत पैसा टक्का लोकांस देण्याबद्दल सावधगिरी बाळगावी, म्हणून सुचविलें आहे. कृष्णंभट नवाथ्ये याच्या सल्यानें कोणास पैसे देणें तर यावें, असें लिहिलें आहे. **सातारचे लोकांना ठक म्हटलें** आहे. हें विधान २०० वर्षांपूर्वीचें आहे. नवाथ्ये हे कऱ्हाडे आहेत, तरी त्यांच्यावर भास्करभटाचा विशेष विश्वास दिसतो हें लक्षांत घेण्यासारखें आहे. पत्र **नं. ५८** चे पत्रांत **अप्पाजी सोमवंशी** सरलस्कर यानें छत्रपति शाहू महाराजांस लिहिलें आहे कीं, कर्जाबद्दल तीर्थरूप हिंदुरावबावास तगादा करूं नये, आपले रु. ६७००० देण्याची तजवीज मी करतों. सरलस्करीवर नेमणूक होण्यापूर्वीचें हें देणें असावें. देवजी हा आपाजीचा बाप होता. कारण त्यास तो तीर्थरूप असें या पत्रांत संबोधीत आहे. पे. द. भा. ४४ पान ७८ वरील वंशावळींत आपाजी हा संताजीचा मुलगा दाखविला आहे. ही चूक दिसते. कैफियतींतील वंशावळी चुकीच्या असणें शक्य आहे. ज्या कैफियती इंग्रजी अमदानींत लिहून काढल्या, त्यांतील वंशावळी काळजीपूर्वक केल्या नव्हत्या, असें त्या वंशवळींत सांपडणाऱ्या चुकांवरून म्हणावें लागतें. मला आमच्या घरच्या इनाम चौकशीच्या वेळीं दिलेल्या कैफियतीमधील वंशावळींत एक पुरुष वगळल्याचें दिसून आलें. ही चूक त्यावेळींच सरकाराकडे मागाहून लिहून दुरुस्त केली. कागद घरीं असतांना ते नीट पाहून मृत्युतिथि किंवा जन्मतिथि काढण्याची खटपट पूर्वीं कोणी केलेली अढळून येत नाहीं. बहुतेक श्रीमंत सरदार घराण्यांत जमाखर्चाचे कागद असत व अजून आहेत. त्यांचा उपयोग पूर्वीं कौटुंबिक किंवा ऐतिहासिक माहिती काढण्याकडे होत नसे. अजून सरदारांनी जमाखर्चाचे कागदांचा ऐतिहासिकदृष्ट्या उपयोग करावा. हें पत्र नक्कल (तालिक) आहे. यामुळें त्यावर शिक्का नाहीं. इतर सोमवंशींच्या पत्रांतील शिक्यांत 'हिंदुराव' ही पदवी देवजी व माधवराव यांस लावलेली आढळून येते. **पत्र नं. ५७।५९।६२।६८।७०।८३।८४** हीं पत्रें **हैबतराव सोमवंशी** यानें वैद्य बंधूना लिहिलीं आहेत. अशींच ३ पत्रें वै. द. खं. १, ६०, ६१, ६३ मध्यें छापिलीं आहेत. त्यावरील शिक्का वाटोळा असून त्यांत निंबाजीसुत हैबतराव असें म्हटलें आहे, या पांच पत्रांपैकीं दोहोवर जो शिक्का व मोर्तब आहे तो हैबतरावानें माधवराव सोमवंशीचा केला आहे व हे दोन्ही अष्टपैलू आहेत. माधवराव हा सरलस्कर केव्हांच नव्हता; त्याचा बाप देवजी हाही सरलस्कर नव्हता. त्यास हिंदुराव किताब होता तोच माधवरावाला चालू होता. शिक्यांत माधवराव हिंदुराव असेंच म्हटलें आहे. हैबतराव हा माधवराव हिंदुरावाचा मुतालीक होता, म्हणून तो त्याचा शिक्का वापरीत असे. (पत्र नं. ६२, ७०, व ८५ पहा) सोमवंशी हे सरलस्कर शाहूच्या

कारकीर्दीत होते. त्यापूर्वी निंबाळकर सरलस्कर होते. शाहू वारल्यावर पुनः रामराजे यांनीं निंबाळकर यांस सरलस्करी दिली. सरलस्कर आतांपर्यंत कोण कोण होऊन गेले याबद्दल रा. ब. सरदेसाई व कै. दत्तोपंत आपटे यांनीं टिपणें केलेलीं मला मिळालीं आहेत, त्यांतील कांहीं चुका सुधारून सरलस्कराची यादी सर्वांच्या माहिती करतां देत आहें.

## सरलस्करची यादी

| नांव | काल | आधार |
|---|---|---|
| हणगोजी, शहाजी व हणमंतराव निंबाळकर | सन १७०८ पूर्वी | प. सा- सं. २२२, २२६ ऐ. प. ५ |
| १ हयबतराव (हणमंतरावाचा मुलगा) निंबाळकर | १७०८ ते १७१४ | पे. द. पृ. ४९४७ ऐ. प. पृ. ७ |
| २ सुलतानजी ,, | ५।५।१४ ते १७२७ | पे. द. पृ. १८८७, ४७०२<br>शा. रो. पृ. ६।२७।२६५ |
| ३ सिधोजी ,, | १३।९।१७२७ ते १७२८ | पे. द. पृ. १०७६, ४५०३, ४११५ |
| ४ दावलजी सोमवंशी | ९।१२।१७२८ ते १७३२ | पे. द. पृ. ११८२, ४५३२ |
| ५ आनंदराव ,, | २६।१।३२ ते १७३५ | पे. द. पृ. २४६५, २५७४<br>शा. रो. पृ. १७, ५४, १३९ |
| ६ त्रिंबकराव (देवजीचा पुत्र) | २३।९।१७३५ ते १७३९ | पे. द. पृ. ३९४, ८६३, २५७४, २५८८, ४५७५ |
| ७ आपाजी ( ,, ) | १७३९ ते १७५० | पे. द. पृ. ४६१७, ४६४६ |
| ८ निंबाजी नाा निंबाळकर | ११।२।१७५० ते १७६८ | पे. रो. वि. १ पान १७१ |
| ९ खंडेराव दरेकर | २९।९।१७६८ ते १७९२ | पे. द. पृ. २०६८ |
| १० सिदोजी नाा निंबाळकर | २।८।१७९२ ते १८१७ | पे. द. पृ. ७१०६ |
| ११ खंडेराव राजे शिर्के | ४।११।१८१७ ते १८३० | म. रि. उ. वि. पृ. ५१३, ६१५ |

या सर्व सोमवंशीच्या पत्रांवरून व पेशवे दफतरांतील सोमवंशीसंबंधाच्या पत्रांवरून त्यांचे दोन पक्ष दिसतात. पहिला त्रिंबकजी, नरसिंगराव व दावलजी यांचा व दुसरा देवजी, आपाजी, हैबतराव, द्वारकोजी, निंबाजी, माधवराव, अमृतराव, रामराव, भगवंतराव व प्रतापजी यांचा. १७३९ मध्यें त्रिंबकजीला काढून आपाजीला नेमल्यावर आपाजीची सरलस्करी राहते किंवा नाहीं याबद्दल शंका वाटत होती. म्हणूनच हैबतरावानें वैद्य बंधूंना त्याबद्दल इतकीं पत्रें लिहिलीं आहेत. सोमवंशी घराणें फार मोठें आहे. पुण्यास एक सोमवंशी वकील आहेत. त्यांचे वडील गेल्यासालीं वारले. त्यांचेकडून समजलें होतें कीं, नगर जिल्ह्यांतील जवळे गांवीं त्यांचें दफतर अजून पुष्कळ आहे. नगर दिवाणी कोर्टांत अजूनही सोमवंशीचे दावे चालू आहेत. त्यांची वंशावळ त्यांत मिळण्याचा पुष्कळ संभव आहे. या ७ पत्रांतील कांहीं गोष्टी लक्षांत घेण्यासारख्या आहेत. त्रिंबकजी सोमवंशीच्या बाजूनें वशिला लावण्यासाठीं राणूबाई म्हणून एक बाई गेली होती. ही कोण हें ठरविणें जरूर आहे. अमृतराव हा साताराचे किल्ल्यांत कैदी होता. त्याचे व द्वारकोजीचे इतराबरोबर नातें काय समजत नाहीं. हैबतरावाला वैद्यबंधूंनीं आपला तिसरा भाऊ मानले होते. मोरो नारायण भाव्ये यांनीं वडझरे गांव आपल्याकडे रु. ७००० ला गहाण ठेविला होता. या सर्व पत्रांवरून वैद्यबंधूंचे शाहूच्या दरबारीं मोठें वजन असल्यामुळें सोमवंशी त्यांचेकडून आपलीं कामें करून घेण्याचा त्यांची आर्जव करीत असें दिसतें. १९१८।१९ सालीं इतिहास व ऐतिहासिक मासिकांत रा. भास्करराव भट यांनी मुद्रांचें प्रदर्शन हा लेख छापिला आहे. त्यांत या सोमवंशीच्या शिक्यांचा किंवा मुद्रांचा उल्लेख नाहीं. आपाजी व त्रिंबकजी सोमवंशी हे एकच असा रा. ब. सरदेसाई यांचा समज होता. आमच्या दफतरांतील कागदांवरून व पेशवे दफ्तरांतील कागदांवरून रा. यशवंतराव मनोहर (फके) यांनीं व मी हे प्रतिस्पर्धी होते असें त्यांस दाखविलें आहे. दावलजीचा मुलगा शहाजी यास वर्षे

दिल्याचा पे. द. ३०·३७३ मध्यें उल्लेख सापडतो. पण तीं सरलस्करीचींच वस्त्रें म्हणण्यास इतर पुरावा मिळाला नाहीं. दावलजीला रुस्तुमराव किताब होता. त्याचा कारभारी धोंडजी महादेव होता. हैबतराव अपाजीला व दारकोजीला तीर्थस्वरूप म्हणतो यावरून तो त्यांच्यापेक्षां वयानें लहान असला पाहिजे. अमृतरावाला चिरंजीव म्हटलें आहे. बाबुराव रघुनाथ हा सोमवंशीचा दिमत होता. वैद्य बंधूंकडे सोमवंशींनी पाठविलेले राघोपंत व गोविंद बल्लाळ हे त्यांचे कारकून होते. पे. द. २२.११२ मध्यें नाईकजी कडू रुस्तुमराव हा त्रिंबकजीचा दिमत म्हटलें आहे. **पत्र नं. ६२** च्या खालीं टिपेंत शिक्यांतील मजकूर ५ भागांत उभी रेघ ओळीसाठीं देऊन लिहिला आहे. **पत्र नं. ८३** तील मजकूर माधवराव व हैबतराव या दोघांचा आहे. त्याचा नासिरजंगावरील स्वारीशीं संबंध दिसतो. **पत्र नं. ८४** मध्यें हैबतरावानें वैद्यांच्या कर्ज फेडीबद्दल मजकूर लिहिला आहे. **पत्र नं. ८९** हें भगवंतराव सोमवंशीचें आहे. यांतील मजकुरावरून हा लढवय्या पुरुष आपाजी सरलस्कराबरोबर लष्करांत होता. तो लढाई संपवून परत घरीं म्हणजे बहुधा जवळ्यास आल्यावर वैद्य बंधूंना लवकरच भेटीस साताऱ्यास येतो असें लिहीत आहे. हा मिरजच्या स्वारींत शाहू महाराजांबरोबर असावा असें वाटतें. या सर्व पत्रांचा काल अदमासानेंच संदर्भावरून लाविला आहे त्यामुळें त्यांचा क्रम चुकण्याचा संभव आहे. पेशवे दफ्तरांतील पत्रांवरून व शिक्यावरून देवजीला त्रिंबकराव, आपाजी व माधवराव असे तिघे मुलगे, देवजी व निंबाजी हें सख्खे भाऊ व निंबाजीचा मुलगा हैबतराव असा एकमेकांचा संबंध असावा असें वाटतें. त्रिंबकरावाचें व देवजीचें वांकडें आल्यामुळेंच आपाजीस सरलस्करी देण्याबद्दल देवजी व हैबतराव यांनीं खटपट केली आहे. सरलस्कर म्हणजे सेनापति असा अर्थ वाटण्याचा संभव आहे. पण शिवाजीनें जे अष्टप्रधान नेमले त्यांत सरलस्करची जागा नाहीं. ही जागा राजारामाचे कारकीर्दींत सेनापतीच्या हाताखालील अमलदार म्हणून निर्माण केली असावी. त्रिंबकजीचा दिमत आनंदराव रघुनाथ होता (पे. द. ३३.३९१ पहा).

## (५) याद्या.

**नं. ४०।४१ चीं** पत्रें केवळ शाहू महाराजाजवळ **सयाजी अहिराव** दिमत हुजुरात याचे हाताखालीं कोणत्या प्रकारचे लोक होते हें दाखविण्यासाठीं छापिलीं आहेत. **नं. ४० मध्यें** सयाजीच्या हाताखालीं खासा सरदार, सबनीस, निशाणदार, व करणेकरी यांचीं संख्या किती होती ती देऊन बळवंतराव दळवी, संभाजीराव विचारे, मालोजीराव गुजर, राणोजी सोमवंशी, मादजी नाईक, बाजखान लोदी, सुभानजी नलवडे, हरजी अराणके, वगैरेंच्या हाताखालीं असलेल्या लोकांची यादी दिली आहे. नं. ४१ चें पत्र यादीचे ३ रें पान आहे. त्यांत धरमनाक, जाननाक, विठनाक व रावनाक या महारांच्या हाताखालीं असलेल्या लोकांचीं नांवें दिलीं आहेत. त्यांत सावंत, मोहिते, पवार, जाधव, खेडकर, मोर्ये, धुमाळ अशीं नांवें आहेत, तीं महारांचींच कीं काय समजत नाहीं. ज्यांच्या शेवटीं नाक शब्द आहे ते महार होत. अशा यादीचें दुसरें पान छापलें नाहीं. त्यांत महाराचीं व मुसलमानांचीं नावें आहेत. शाहू महाराजांचा सर्वसंग्राहकपणाचा लौकिक यावरून व्यक्त होतो. **नं. ४०** मधील 'निशाणदार' याचा अर्थ 'डंकेवाला' समजावा. यांतच 'दसन मालदार' शब्द आहे, त्याचा अर्थ कळत नाहीं. तो 'पसनमालदार' असाही वाचतां येईल, पण त्याचाही अर्थ समजत नाहीं. तीन पानें मिळून एक यादी आहे. याशिवाय यादींतील नांवांचें तेरीज केलेलें एक पत्र छापिलें आहे. त्यावरून यादींतील कांहीं नांवें स्पष्ट लावतां येतात. एकंदर लोकांची संख्या १६८ आहे. पत्र नं. ४१ मध्यें एकंदर लोकांचें तेरीज २४ दिलें आहे. हें सर्व महार लोक आहेत. यांना न छापलेल्या तेरजेच्या पानांत '**परवरे**' लोक म्हटलें आहे. हा शब्द 'धेड' किंवा 'महार' या शब्दापेक्षां सौम्य आहे. तेरजेच्या यादींत मुक्काम **मिरज** दिला आहे; यावरून हे लोक शाहूमहाराजाबरोबर मिरजेच्या स्वारींत होते, असें अनुमान निघतें. भास्करबावांचे **सिलकबंद नं. ४२। ४३। ४४** हे याच सुमाराचे म्हैसाळ व खंडेराजुरीच्या मुक्कामाचे आहेत. हीं दोन्हीं गांवें मिरजेपासून लांब नाहींत. **पत्र नं. ७५** ची यादी वैद्यांच्या जामदारखान्यांतील कपड्यांची आहे. हे कपडे अहेर म्हणून त्यांना **जेजुरीस**

मिळाले आहेत. या सालच्या कांहीं जमाखर्चांत याचा कांहीं माहिती मिळूं शकेल. बाळंभट हे शाहू महाराजां-बरोबर जात असत. मिरजेच्या स्वारींत ते होते. हा अहेर भास्करबावांच्या मृत्यूनंतरचा दुखवटा असावा. त्यांचा काल ३०।३।१७३९ रोजीं झाला. अहेर करणाऱ्यांत पेशवे, वासुदेव जोशी ( कल्याणकर ), बाळाजी बावाजी वैद्य अंबेरकर, रामचंद्र हरी पटवर्धन वगैरे जिव्हाळ्याचीं माणसें दिसतात. ' अज मनगे ' म्हणजे ' एकूण सनगे ' असा अर्थ आहे. अहेरांत तिवटें व पासोडीया असें कापड आहे. त्याचा अर्थ ' तिवट ' म्हणजे ' पागोटें ' व ' पासोडिया ' म्हणजे ' एक उंची वस्त्र ' असा समजावा. **पत्र नं. ८०** ही एक यादी भास्करबावा वैद्यांच्या रकमा कोणाकडे किती होत्या हें दाखविणारी आहे. यांत कृष्णाजी नाईक जोशी ( बापूजी नाईक जोशांचे चुलते ), बाबुराव कोनेर कोलटकर, त्रिकमजीशेट गोविंदजी, विठोबा नाा रत्नपारखी, कृष्णंभट नवाथे व कृष्णाजी बल्लाळ करमरकर अशा प्रसिद्ध लोकांचीं नांवें आहेत. **पत्र नं. ८१** ही एक यादीच **भगवंतराव सोमवंशी** यास १७३८ सालीं नक्त रोजमुरा व कापड दिल्याच्या तपशिलाची आहे. हा सोमवंशी महा-राजांच्या मिरजेच्या स्वारींत होता, असें म्हणण्याचें कारण त्यास दिलेले नक्त रुपये व कापड मुकाम खंडेराजुरी येथें दिल्याचा यांत उल्लेख आहे. पत्र नं. ६० या खाजगत खर्चांत वैद्यांनीं भगवंतरावास ३० रुपये दिले आहेत. **पत्र नं. ७८** ही यादी **श्रीनिवास** ऊर्फ **श्रीपतराव प्रतिनिधिचा** वैद्याकडे जो देवघेवीचा व्यवहार होता त्याच्या हिशोबाची आहे. यांत **बाजी जगजीवन** नांव आहे. हा प्रतिनिधीच कीं काय ? हिशोबांतील जगोबा नाा गोडसे हाही नेहमीं वैद्यांच्या कारभारांत वावरणारा बावधनचा महत्त्वाचा मनुष्य आहे.

## ( ६ ) कर्जरोखे.

यावेळीं वैद्यांनीं करून घेतलेले हे पुष्कळ कागद आहेत. त्यांपैकीं नमुन्यादाखल हे निवडले आहेत. पहिल्या बाजिरावाचे कारकीर्दीत भास्करबावांच्या नांवें सर्व देवघेव असे. त्यांचे वडील हयात होते तरी ते कोकणांतच असत. **पत्र नं. १४** मधील **गंगाप्पा मुगावकर** ह्यानें २,००० रु. नेले आहेत. पत्र **नं. ३४** मधील **खंडो-मल्हार** उसने रु. १५ मागतो. तो सिंहगडचा राहणारा, विशेष परिचयाचा तोरणा ऊर्फ प्रचंडगडचा नामजाद (अमलदार) होता. **पत्र नं. २९।३९ व ४१** मधील ऋणको जानोजी मोइटे व **जनार्दन देव** हीं अगदीं नवीन माणसें आहेत. त्यांचा पुढील काळांतील कागदपत्रांत पुष्कळ वेळा उल्लेख आला आहे. मोइटे घराण्याचा उल्लेख मोरे यांच्या बखरींत सरदार म्हणून आहे. जनार्दन देव हा संस्कृतज्ञ धनकोस **धनिक** व ऋणकोस **ऋण-गृहित** म्हणतो व सहीच्या ठिकाणी फक्त **ओम्** लिहितो. हा चिंचवडच्या देवांपैकीं असावा. **पत्र नं. ३६** मधील कर्जदार **चौघुले**, त्रिंबकराव पेठ्यांचें इनाम गांव सोनगांव येथील आहेत. वैद्यास सोनगांवीं इनाम जमीन होती, यामुळें त्या गांवांशीं त्यांचा संबंध आला आहे. हे पैसे आठवड्याच्या मुदतीनें बिनव्याजी दिले होते. पण मुदत टाळूं नये म्हणून अठवड्यानंतर व्याजाचा दर दरमाहा दर शेकडा रु. ५ लावला आहे. कर्जरोख्याची भाषा अगदीं अलीकडील वाटते. व्याजाचा दर त्यांत द. म. द. शे. २ ते ५ पर्यंत असून दरसालचा दर दिलेला नाहीं.

## ( ७ ) प्रॉमिसरी नोटा.

पत्र नं. २६ व २७ ह्या **मल्हारराम घारपुरे** यांनीं काल पाटील जगथाप यास लिहून दिल्या आहेत. वैद्य, घारपुरे व जगताप हे पैशाच्या केवढ्या उलाढाली करीत हे खंड १ मध्यें त्यांच्यासंबंधानें छापलेल्या पत्रावरून कळून येईल. या नोटींतील रकमाबद्दलचा व्यवहार वै. द. १, ३८, ३९ या पत्रांत स्पष्ट झाला आहे. शिकेनिविसीच्या सनदा जगथापास होत्या. त्या दरसाल नव्या घ्याव्या लागत असाव्या. **शिकेनिविशी** हा राजमुद्रा मारण्याचा हक्क जगथाप घराण्याकडे होता असें दिसतें. जगथाप हे पंतप्रधानानाही हजारो रु. देत असत. हे वै. द. १. ३२, ३३, ३४, ३६, ३८ या पत्रांवरून दिसून येईल. प्रॉमिसरीची भाषा अगदीं अलीकडील वाटते.

## ( ८ ) कर्जफेड व पावत्या

**पत्र नं. ४७ व ६५** हे गोसाव्यांशीं केलेल्या देवघेवीचे कागद आहेत. **कामेश्वर बनगोसावी यानें** कृष्णंभट नवाथ्ये याचे रु. २७७ देणें होतें. त्याची फेड आपला शिंगा नवाथ्ये याजपाशीं होता तो विकून फेडून घ्यावी व नफा झाल्यास मी मागणार नाहीं असें तो म्हणतो. कृष्णंभट नवाथ्येच काय पण भास्करबावा वैद्य ( ४ ) ही गोसाव्यांना उसनवार पैसे देत असत. **पत्र नं. ३७** यांत त्यांनीं तिघां गोसाव्यांना पैसे दिल्याचें आढळून येईल. पैसे पोचल्याचीही त्यांची पावती कृष्णाजी बल्लाळ करमरकर यास दिली आहे. आश्विन शु. १।१६६० चे रु. ६५ नेल्याचें त्याचें एक खत असून त्याचा हिशोब श्रावण व. ७।१६६२ रोजीं व्याजासह पुरा केलेला आहे. पूर्वी गोसावी हा वर्ग फार संपत्तिवान् असल्यामुळें वजनदार होता. ते राजे लोकांना पैसे देत असत. पुणें व सातारा येथें गोसावीपुरे आहेत. गोसाव्यांचीं पत्रें लिहिण्याची पद्धत व निरनिराळीं नांवें कळण्याकरतांच हे कागद निवडले आहेत. पण या पत्रांत हे गोसावी नवाथ्याचे व वैद्यांचे ऋणको आहेत. हे पत्रांत साष्टांग नमस्कार न लिहितां **नमोनारायण** लिहितात. **पत्र नं. ६५** वर साक्ष वरियाच्या पाटलाची आहे. व्यंकटराव गंगाधर हणमंत्याची सून अन्नपूर्णाबाई इनें श्रीवासुदेवस्वामी म्हणून एक गुरु केला होता. त्याची समाधि वरियास आहे. ह्याचा कामेश्वर बनगोसाव्याशीं संबंध आहे कीं काय हें पाहिलें पाहिजे. हे गोसावी आपली निशाणी त्रिशूळ करितात. **पत्र नं. ६७ महादाजी गदाधर** अमात्यानें जोंधळे देऊन कर्ज फेडल्याची वैद्यांची पावती आहे. जोंधळयाचा दर ८ पायली १ शेर १ मापटे होता. माप कसें मांडलें आहे हें शिकण्याजोगें आहे. हा अमात्य वैद्याकडून मोठमोठ्या रकमा नेत असे, हें दाखविण्यासाठीं हिशोबाचें पत्र नं. ७९ छापिलें आहे तें पहावें. त्यांतील कांहीं मजकूर फाटलेला आहे. **पत्र नं. ६१** ही पावती **गोपाळभट पुराणिक कासीकर** यांनीं **लक्ष्मीबाई वैशंपायन** बद्दल रु. १०० पोचल्याबद्दल दिली आहे. या पुराणिकाकडे तिचें माहेर असावें. हिचा हिसेब पत्र नं. ५३ मध्यें दिला आहे. त्यांत रामचंद्र गोपाळ यास ती तीर्थरूप म्हणते. हा नांदिवड्याचा राहणारा होता. लक्ष्मीबाईला कर्ज दिलें होतें त्यांपैकीं कांहीं रकम परत आल्याचें रघुनाथभटाच्या पत्र नं. ६ मध्यें दिलें आहे.

## ( ९ ) जामीन कतबा.

**पत्र नं. २१** रा. संभाजी राणे यानें वैद्याकडील नोकराबद्दल दिला आहे. असे जामीन कतबे नोकराकडून पूर्वी घेत असत त्याचा हा एक नमुना आहे. असे कतने दफतरांत पुष्कळ आहेत. यांतील 'तालुकातीचा' या शब्दाचा अर्थ ' संबंधाचा ' इतकाच आहे, '**तालुका**' म्हणजे मामलेदाराच्या ताब्यांतील भाग असा अर्थ येथें नाहीं. ' **हजिर जामीनविशी** ' म्हणजे ' कामावर हजर ठेवण्याबद्दल हमी ' असें समजावें.

## ( १० ) शिलकबंद.

दफतरांत हे पुष्कळ आहेत. त्यांपैकीं कांहीं महत्वाचे घेतले आहेत. **पत्र नं. ३८** हा मल्हारराम घारपुरे यांचे मार्फत आलेला ज्येष्ठ शु. ८ व वद्य १३।१६६० पर्यंतचा अष्टे येथील मुक्कामचा ४१॥ रुपयांचा जमाखर्च आहे. तो शेतीसंबंधाचा आहे. सोनगांव हें खेडें सातारा तालुक्यांत विरमाड्याजवळ मामा पेठ्यास इनाम होते, तेथें बावधनप्रमाणें वैद्यास इनाम जमीन होती. यांत **केसो हरी सावरकरा**कडून रु. ४ जमा आहेत. हा वैद्यांचाच कारकून होता. सोनगांवच्या जमीनीच्या वाटेकऱ्यांचीं नांवें यांत आहेत. घारपुरे व वैद्य हजारो रुपयांचे व्यवहार करणारे होते तरी किरकोळ रकमांचे हिशोब कसे ठेवीत याचा हा नमुना आहे. **पत्र नं, ४२।४३।४४** हे सिलकबंद भास्करबावा वैद्य यांचे खाजगत जमाखर्चाचे म्हासाळ व खंडेराजूरी या मुक्कामचे आहेत. त्यांचे मुक्काम सोनी व गौरवाड येथें असतांना लिहिलेले सिलकबंद वै. द. खंड १-४३,४५,४६,४७ मध्यें छापिले आहेत. पे. द. १७-७९ हें पत्र दादोबा पुरंदरे यांनीं गौरवाडाहून बाजिरावास लिहिलें आहे. त्यावेळीं श्रीपतराव प्रतिनिधींनीं माहुलीस कोटहोम केला. यावेळचे शिलकबंद दफतरांत बरेच आहेत. ते तारीखवार लाऊन पहातां वैद्यांचा मुक्काम

१०।८।१७३८ ला म्हासाल म्हणजे म्हैसाळ येथें आला. तेथून ते १६।८।३८ ला खंडेराजुरीस गेले. तेथें त्यांचा मुक्काम ४।९।३८ पर्यंत होता. नं. ४४ चा सिलकबंद खंडेराजुरी मुक्कामाचा आहे. यांतील मजकूर विशेष महत्त्वाचा नाहीं. शाहू महाराज यावेळीं मिरजेच्या स्वारीसाठीं उंब्रजेस जाऊन राहिले होते. तेथें छावणी करून तेथून ते आजूबाजूस जाऊन परत येत असत. तिकडे त्यांचा मुक्काम १७३७ ते १७३९ अखेर होता. त्यावेळीं भास्करबावा त्यांच्याबरोबर होते. या सिलकबंदांतील किरकोळ खर्च रुक्के व टक्के यांत असून त्यांचे रुपये करतांना १० रुके = १ आणा असा हिशोब केला आहे. शिलकेंत मोहोरा होत्या, त्याचा दर रु. १३ दिला आहे. यावेळीं नरसिंगराव व भगवंतराव जगथाप व राणोजी भोसले महाराजाबरोबर असावे. जगथाप व महादोबा नाा तांबवेकर यांच्या रकमा जमा असून त्या सचीव व राणोजी भोसले यांस दिल्याची नोंद यांत सांपडते. **पत्र नं. ८६ व ८७** विश्वनाथभटांचे दोन खाजगत सिलकबंद आहेत. यांपैकीं एक दुकानाचा हिशोब व दुसरा घरचा हिशोब आहे. यांतील तपशिलावरून वैद्यांचें सातारा येथील **कापडाचें दुकान खाजगत** असावें. २७।३।१७४० ची रोज गुा शिलक १७९५२॥।-॥ होती. या दुकानांत गणोबा नाा कोलटकर, कृष्णाजी महादेव रानडे, पंत सचीव, प्रतापजी सोमवंशी, यशवंत महादेव पोतनीस, नारोबा नाा अनगल यांची मोठी देवघेव असावी. गोविंद हरी हा सचिवाकडील कारभारी असावा. रानडे हा वैद्यांचा जांभळी इनाम गांवीं कारकून होता. दुकानांत पाती होती असें म्हणण्याचें कारण पत्र नं. ८७ मध्यें रु. ७३६०॥ ‘ कसर व्याज हिशांपैकीं ’ असें म्हटलें आहे. हें दुकान पुष्कळ दिवस चालूं होतें. विश्वनाथभट नागपूराकडे गेले म्हणजे तिकडून कापड व सूत सांडणीवरून पाठविल्याचीं पत्रें आहेत. व या मालास वाईपर्यंत जकात पडूं नये व अडथळा होऊं नये म्हणून भोसल्यांचीं दस्तकें ते घेत असत.

## ( ११ ) हिशोबाचे कागद.

यांत ज्या व्यक्तींबरोबर वैद्यांची देवघेव होती त्यांचे हिशोब वरचेवर पुरे करून पैशाची फेड करण्याची तजवीज झाली आहे. या हिशोबांत पुढील गोष्टी मुख्यत्वें करून लक्षांत ठेवण्याजोग्या आहेत ( १ ) व्याजाचा दर दरमाहा दरशेकडा आहे. दरसाल दर शेकडा काढावा लागतो. ( २ ) हा दर २ ते ५ पर्यंत आहे. ( ३ ) व्याज मुदलापेक्षांही जास्त झालें म्हणजे आपण त्यास अलीकडे पठाणी हिशोब म्हणतो. असे हिशोब यांत आहेत. (४) व्याजांत **बारोत्रा** म्हणजे $\frac{1}{12}$ सूट देण्याची बहुतेक चाल होती. ( ५ ) कांहीं हिशोबांत **बारोत्रा** सूट देऊनही शिलक रकम राहिली तर ती **सोड** म्हणून दाखवून बाकी शून्य केली आहे. (६) कांहीं रकमांची फेड गल्यांत केली आहे. (७) एका हिशोबांत दस्तुरीचा उल्लेख आहे, त्याचा अर्थ समजत नाहीं. (८) अकबरी मोहरा हा एक मोहरांचा प्रकार असावा. रा. नानासो चाफेकर यांनीं ‘ पेशव्यांच्या सावलींत ’ या पुस्तकांत दिलेल्या मोहरांच्या प्रकारांत हा प्रकार नाहीं. **पत्र नं. १५ व १७** यांमधील **काणे** वैद्याशीं फार मोठे व्यवहार करणारे आहेत. हे कोकणांतील वरवडे गांवचें खोत होत. त्यांचें कुटुंब मोठें असून यांच्याशीं वैद्यांचा नात्याचा पूर्वीचा संबंध झालेला आहे. त्यांच्यापैकीं कांहीं पुरुष बंगाल्यांत भास्कररामाबरोबर गेले होते व भोसल्यांच्या दरबारीं यांना फडणिशीही मिळाली होती. पुढील पेशव्यांचा कारकीर्दीतील यांचे पुष्कळ कागद सांपडले आहेत, ते पुढील खंडांत छापण्यांत येतील. हे हिशोब पठाणी हिशोबाचा एक नमुना आहे. १७३५ सालीं मुद्दल रु. ३०० होते. १७३६ सालीं त्याचें व्याज ६९५ झालें. १७३६ मध्यें रु. १७५० दिले. त्याचें व्याज १७३७ मध्यें रु. २८८० झालें. शके १७५३ पासून यांच्याबरोबर देवघेव झालेली आहे. **पत्र नं. २० व ५०** मधील **पुरुषोत्तमभट शेवडे** हा कोकणस्थ आपटे घराण्यांतील मनुष्य असावा. शेवडे म्हणजे शेवटे. आपटे यांच्या घरांतील शेवटच्या घरच्या कुटुंबास शेवडे म्हणूं लागले. पण शेवडे हें नांव कऱ्हाड्यांमध्येंही आहे. त्याची उपपत्ति वरीलप्रमाणेंच लावतां येईल. पण कऱ्हाड्यांतील, कोणत्या घराण्यांतील कोणत्या गांवांतील शेवटचें घर हें समजलें पाहिजे. वैद्याचा या शेवड्याशीं देवघेवीचा मोठ्या रकमेचा व्यवहार होता. **लासुर्णे** हा गांव **माहादाजी गदाधर** अमात्याचा होता. हे निरनिराळ्या लोकांकडून कर्जें काढीत. शेवड्यांच्या कर्जांच्या फेडीसाठीं ह्या गावचा गल्ला वैद्यांस दिल्याचे वै. द. खंड

१.४२ मध्यें दिलें आहे. हा गांव वैद्याकडे कर्जफेडीसाठीं दिल्याबद्दल पत्रें आहेत. **पत्र नं. ५०** मधील हिशोबांत **दौलतराव शिर्के** याजकडील १००० ह्या पैकीं शेवड्याकडे वैद्यांचे रु. ६६७ येणें दाखविले आहेत. शाहूंची राणी सकवारबाई ऊ. राणूबाई ही रामोजी शिरक्याची मुलगी होती. वै. द. खंड १.१४,१५ मधील शिर्क्यावरून हे शिरके दाभोळ प्रांताचे देशमुख व सुभेदार होते, असें दिसून येईल. शिर्क्यांतील कानोजी हा सकवारबाईचा भाऊ होता. दौलतराव शिरके हाही सकवारबाईचा भाऊ होता. पत्र **नं. ३३** मध्यें त्याला वैद्यांनीं रु. १०० दिल्याचा उल्लेख आहे. शिरके घराण्याबद्दल जास्त माहिती पत्र नं. ३३ खालीं दिली आहे. **पत्र नं. २३** मध्यें **मल्हारराम** घारपुऱ्याचा हिशोब असून पत्र नं. २६ व २७ मधील कालोजी पाटील जगथाप यास देवघेवीबद्दल लिहिलेल्या पत्रांतील रकमा दिल्या आहेत. मल्हाररामाबरोबर रंगो विठलाचेंही नांव आलें आहे. त्याचें आडनांव समजलें नाहीं. मल्हाररामांच्या हिशोबांत 'इजमाइली' शब्द आहे याचा अर्थ 'कच्चा हिशोब' व 'वळसे' याचा अर्थ 'पेंडी' असा आहे. **जगथापाचे** घराणेंही त्यावेळीं राजदरबारीं वावरणारे होतें. जगथापांचा उल्लेख वैद्य दफ्तर खंड १ मधील कागदांत १०।१२ वेळां आला आहे. हें त्या खंडाच्या सूचीवरून कळेल. यांनीं **पंतप्रधानाशीं**ही पैशाची मोठी देवघेव केली आहे. **पत्र नं. २२** हा **भास्करबावा** (४) वैद्याचा हिशोब असून त्यावरून पेशव्याशीं व नरसिंगराव जगथापाशीं त्यांचे कसे मोठ्या रकमांचे केवळ चिठ्यावरून व्यवहार होत, याची कल्पना होते. यासंबंधीं वै. द. खंड १.३३, ३४ चीं पत्रें वाचलीं असतां जास्त खुलासा होईल. यांतील रकमांचा उल्लेख त्यांत आहे. **पत्र नं. २४ व २५** हे हिशोब **अंताजी शिवदेव भडभडे** यांचे आहेत. यांत व्याजांत $\frac{1}{2}$ वजा न करतां ठोक रु. ५ सूट दिली आहे. भडभडे ही व्यक्ति अगदीं नवीन आली आहे. अंताजी शिवदेव हे नांव प्रतिनिधींच्या मुतालिकाचा पूर्वज यमाजीचा भाऊ म्हणून आलेलें आहे; पण तो हा नव्हे. तो यजुर्वेदी होता. अंताजी शिवदेव **फळणीकर** अशा नांवाचीं पुष्कळ पत्रें दफ्तरांत आहेत. हा वैद्यांचा कारकून होता असें दिसतें. फळणीकर व भडभडे हे एकच असावेत. हीं कऱ्हाडे घराणीं आहेत. पण त्यांचीं गोत्रें निरनिराळीं आहेत. या हिशोबांत **संकराजी कान्हो** व **कृष्णाजी बल्लाळ करमरकर** हीं नांवें आलीं आहेत. संकराजी कान्हो हा वैद्यांचा कारकून वऱ्हाडांत भुगावच्या वसुलीच्या कामावर होता व दक्षिणेंत आल्यावरही इकडील कामें करीत असे. तसेंच कृष्णाजी बल्लाळ करमरकर हाही वैद्यांचा कारकून **जांभळीचा** बसूल करीत असल्याचा पत्रव्यवहारांत उल्लेख आहे. फळणीकर व भडभडे यांचा संबंध ठरविणें संशोधनाचा विषय आहे. पत्र **नं. २८** हा **शिवाजी जाधव सिंदखेडकर** याचा हिशोब आहे. हिशोब लहान रकमेचा असला तरी हे सिंदखेडच्या जाधवांचें घराणें फार महत्वाचें आहे. शाहूमहाराजांची पंजीबाई **जिजामाता** ही लखूजी जाधवाची मुलगी होती. **धनाजी जाधवराव** हा याच घराण्यांतील होता. राजाराम **जिंजीस** गेल्यावर बादशाही फौजेस विजय मिळविण्याचें श्रेय यानें घेतलें म्हणून यास राजारामानें **जयसिंहराव** किताब दिला. (म. रि. राजाराम पान ३८ पहा) पान ३७ वर दिलेल्या वंशावळींत **शिवाजी जाधवाचें** नांव आलेलें नाहीं. याबद्दल जास्त विस्तृत वंशावळ पाहून शिवाजीचे **धनाजीशीं** काय नातें होतें हें पाहिलें पाहिजे. अशा इतिहासप्रसिद्ध घराण्याशीं वैद्यांचा संबंध होता हें लक्षांत घेण्यासारखें आहे. पे. द. १६.१११ पत्रांत सिवाजी जाधवरावाचा उल्लेख आहे. तो हाच कीं काय? **पत्र नं. ३०** हा **येसाजी अनंताचा** हिशोब आहे. तो जरी लहान रकमेचा आहे, तरी त्यांतील व्याजाचा हिशोब कसा केला हें समजत नाहीं व तो शाहुमहाराज मिरजेच्या स्वारीसाठीं उंबरजेस मुक्काम करून होते, त्यावेळी त्यांचेबरोबर असावा. याचा उल्लेख पे. द. ३३.५३, २५९ व २९९ या पत्रांत आलेला असून तो जंजिऱ्याच्या **सिद्दीवरील** स्वारींत लढवय्या म्हणून गाजला आहे व तो महाराजांच्या मर्जीतला होता असें हीं पत्रें व वै. द. खं. १-२७ वाचल्यावरून दिसून येतें. **भास्करबावा** (४) वैद्यांनीं त्याची तरफदारी केली आहे. **गोवलकोटच्या** लढाईत याचा संबंध संताजी जाधव, दुर्गोजी भोईटे व बाबाजी म्हसके या बरोबर आलेला आहे. **पत्र नं. ३१** ही एक हिशोबाची यादी वैद्याकडील रकमा नारोबा नाईक अनगळास ज्या लोकांकडून मिळाल्या त्यांची आहे. यांतील देवघेव मोठ्या रकमांची असून त्यांत पुढील महत्वाच्या पुरुषांचा समावेश झाला आहे. ऊ. कोनेरराम

कोलटकर, रघुनाथ भट पटवर्धन, नरसिंगराव जगथाप, दादोबा पुरंदरे, भगवंतराव जगथाप, सेखमिरा, गणोबा ना कोलटकर, गंगाधर ना रास्ते, जगोबा ना गोडसे, शिवाजीपंत राजवाडे, पुरुषोत्तमभट शेवडे, व सेखोजी खोबडे. **पत्र नं. ३२** हा **सेखोजी खोबडे** याचा हिशोब आहे. हा वरचेवर रकमा नेत असे. १७४२ मध्यें मुद्दल घेऊन त्यास कर्जमुक्त केले आहे. वै. द. खंड १.५३ मधील सेखोजी हाच असावा. याचा जगथाप नवाथ्ये, व मल्हारराम घारपुरे यांच्याशीं संबंध आलेला दिसतो. **पत्र नं. ३३** यांत वैद्यांनीं ज्यांना पैसे दिले त्यांचीं नांवें दिलीं आहेत. **कर्जदाइन** याच्या उलट शब्द **कर्ज-गिरत्पन** किंवा **कर्ज-आमदान** असा वापरतात. या पत्रांतील व्यक्ति महत्त्वाच्या असून त्यांचा इतर पत्रांत उल्लेख आला आहे, नेथें त्यांचें महत्त्व दर्शविलें आहे. तथापि **येसाजी कंक, राणोजी भोसले, बहिरो विश्वनाथ, गुणाजी** व **दौलतराव सिर्के** त्यांबद्दल दोन शब्द लिहिणें जरूर दिसतें. **येसाजी कंक** हा शिवाजीचा विश्वासू सरदार फोंडा येथील युद्धांत होता. याच्या पराक्रमाबद्दल संभाजी महाराजांनीं यास २००० होन बक्षीस दिल्याचें २३।६।१६८५ चें पत्र म. रि. संभाजी पान ५५ मध्यें छापिलें आहे. संभाजी वारल्यावर **राजारामास रायगडाहून** आणून गादीवर बसविण्यांत ज्यांनीं पुढाकार घेतला त्यांत येसाजी कंक होता, तोच हा कंक कीं काय ? **बहिरो विश्वनाथ** हा करांडे असावा, असें पत्र नं. ४५ मधील नांवावरून वाटतें. शिरक्यांचा छत्रपति घराण्याशीं निकटचा संबंध होता. शिवाजी महाराजांच्या आठ बायकांपैकीं **सगुणाबाई** व **सोयराबाई** या शिरक्यांच्या मुली होत्या ( म. रि. शिवाजी पान २०९ ). संभाजीची स्त्री **जिऊबाई** ऊर्फ **येसूबाई** ही गणोजी शिर्क्यांची बहीण व शिवाजीच्या ६ मुलींपैकीं **सगुणाबाईची** कन्या **नानीबाई** ही गणोजी शिर्क्यांस दिली होती. संभाजीची सावत्र आई **सोयराबाई** इनें शिवाजी वारल्यावर राजारामास गादीवर बसविलें व आपणास विषप्रयोग करण्यांत तीच मुख्य होती अशी संभाजीची खात्री होऊन त्यानें तिला ठार मारलें. इतकेंच नव्हे तर तिच्या माहेरच्या भाऊबंदांस ठार मारून त्यांचीं उत्पन्नें व संपात्ति सरकारांत घेतली. या प्रकारासच **शिरकाण** म्हणजे शिरक्यांची कत्तल असें लोक म्हणूं लागले. ( म. रि. संभाजी पान ३० व १०५ ). या कृत्यामुळें शिरके घराणें मोगलांस जाऊन मिळालें. पण राजारामाच्या कारकीर्दीत **खंडो बल्लाळ** चिटणीस यानें गणोजीस पाहिजे होतें तें आपलें दाभोळचें देशमुखीचें वतन देऊन मोगलांकडून फोडिलें. त्याच शिरक्यानें मोहित्यांचें साहाय्य घेऊन राजारामास जिंजीहून काढून आणून **वेलोरास धनाजीच्या** स्वाधीन केलें व त्यानें त्यास महाराष्ट्रांत १६९८ मध्यें आणलें. गणोजीचा पुतण्या **रामोजी** याची मुलगी **सकवारबाई** ही शाहूची स्त्री होती. दौलतराव शिर्के हा सकवारबाईचा भाऊ होता हें पूर्वी दिलेंच आहे. या पत्रांतील गुणाजी शिरके याचा संबंध, छत्रपतीशीं संबंध असलेल्या शिरक्यांशीं आहे कीं काय याबद्दल संशोधन झालें पाहिजे. **पत्र नं. ३५, ५१ व ६३ मध्यें** सातारच्या दुकानाचे हिशोब दिले आहेत. यांत **बाबाजी नाईक पारकर** ह्याचा संबंध, आला आहे. वै. द. खंड १.३५ मध्यें याचें नाव आलेलें आहे. या हिशोबांत ज्या माणसांचीं नांवे आहेत तींही मोठ्या सावकारांचीं आहेत. व तीं पूर्वी हिशोबांत येऊन गेलीं आहेत. **पत्र नं. ३५** मध्यें **बाळाजी शामजी** हा एक नवीन मनुष्य आला आहे. **पत्र. नं. ६३** मध्यें राजश्री **रामदासस्वामी** यांचे नांवें रु. १०० पडले आहेत. त्यावेळीं चाफळच्या गादीवर **श्री लक्ष्मणबावा** होते ते श्रीसमर्थांचे बंधु श्री·गंगाधर बावांचे वंशज होते. या पत्रांत **अंताजी नाईक भिडे** यांचा उल्लेख आहे. भिडे हे सावकार घराणें कोंकणांतील **गणपतिपुळ्याहून** इकडे येऊन प्रसिद्धीस आलें. यांचे वंशज सध्यां पुणें येथें बुधवारांत आहेत. यांचें प्रथमतः सातान्यास सराफीचें दुकान होतें पुढें पेशव्यांबरोबर ते पुण्यास आले व तेथें त्यांनीं दुकान सुरू केलें. यांनीं पेशवे, शाहूमहाराज, भोसले, गाईकवाड यांस पैशाचा पुरवठा केल्याबद्दल पुढील काळांतील कागदांत उल्लेख येतील. अंताजी नाइकांनीं **कृष्णाजी ना जोशी** यांच्या पत्र नं. १३ वर साक्ष घातली आहे. **जानोजी भोइटे** हा वैद्याचा कुणबी होता ( पत्र. नं. २९ पहा ) **पत्र नं. ६३** मध्यें **मोरभट गुण्यांचा** उल्लेख आहे. पत्र नं. ५१ चे शेवटीं **गणोराम ना** कोलटकर असें नांव आहे. **पत्र नं. ४६, ४८ व ६४** ह्या हिशोबांत नवीन माणसें **तुळबाजी मोरे, रघुनाथभट पटवर्धन गणेशभट्ट**

**पाठक, केसो महादेव वैशंपायन** व **शिवराम तुकदेव** हीं आलीं आहेत. हे **मानाजी पवाराचे हिशोब** आहेत. या महत्त्वाच्या सरदाराचा वैद्य घराण्याशीं संबंध आलेला आहे. या पवाराबद्दल माहिती मला नव्हती. देवासचा इतिहास लिहिणारे रा. काशिनाथ गोपाळ पिंगळे हे पुण्यास १९४४ मध्यें आले असतांना त्यांनीं मला पवारांची वंशावळ दिली आहे. तीवरून मानाजी हा काळोजीचा मुलगा होता असें समजतें. हाच देवासच्या संस्थानिकांचा मूळ पूर्वज होय. यास ४ मुलगे होते. त्यापैकी दोघे **तुकोजी** व **जिवाजी देवासच्या** गादीवर आले. **कृष्णाजी** हा नगरकडील सुभ्याकडे होता.त्याचे वंशजांस **सुपेकर** म्हणतात व मानाजीस **पाथरकर** म्हणतात. याचा दिवाण **नरसी सामराज** होता, त्याचा उल्लेख पत्र नं. ४७ मध्यें आला आहे. **काळोजीचा** भाऊ **संभाजी** हा **धारच्या** संस्थानिकांचा मूळ पुरुष याचे वंशजांचाही वैद्य घराण्याशीं देवघेवीचा संबंध झाल्याचीं पत्रें आहेत; तीं पुढें छापलीं जातील. **मानाजी पवार** हा सन १७३५ च्या **गोवळकोटच्या** लढाईच्या वेळीं पेशव्यांतर्फे लढत होता. (पे. द. ३३–५३ पहा) पेशवे दफ्तरांतील हें पत्र अर्धवट आहे, तथापि त्यांतील मजकूर महत्त्वाचा असून त्यावरून मानाजीचा संबंध येसाजी अनंत, दुर्गोजी भोइटे, बाबाजी म्हस्के, संभाजी आंग्रे या सरदाराशीं आला आहे असें दिसून येईल. या तीनही मानाजीच्या हिशोबांत गणोबा ना। कोलटकर, **जनार्दन शेटे** व **सदाशिवना लिमये** यांचा उल्लेख आहे. हीं महत्त्वाचीं माणसें इतर पत्रांत येऊन गेलीं आहेत. **पत्र नं. ४९ हा संभाजी घोरपड्याचा** हिशोब आहे. शंभुसिंग हें संभाजीचेंच नांव आहे. याच्या हिशोबाचीं ३१४ पत्रें दफ्तरांत आहेत, त्यांपैकीं हें एकच छापिलें आहे. यांत **यशवंतराव पोतनिसांचा** उल्लेख आहे. **जंजिऱ्याच्या** युद्धांत हा घोरपडे त्याच्याबरोबर असावा. संभाजी हा **मुराररावाचा** पुतण्या असावा असें वाटतें. **पत्र नं. ५२ हा धोंडो गोपाळ** याचा हिशोब आहे. हा **पंतसचिवांकडील** मनुष्य असावा. याचा उल्लेख पत्र नं. ५१ च्या हिशोबांतही आहे. **पत्र नं. ५४** यांत **राणोजी भोसले** यांस वैद्यांनीं दिलेल्या रकमांचा हिशोब १७४१ आगष्ट पर्यंतचा आहे. या रकमा फार मोठ्या आहेत. राणोजी हा रघूजीचा चुलता. याचा भाऊ **संताजी**. हे दोघे भाऊ मराठ्यांतर्फे १७१८।१९ च्या **दिल्लीच्या स्वारींत** होते. पण संताजी त्यांत मारला गेला. हा परसोजीचा दासीपुत्र असून तो पराक्रमी होता. राणोजीही पराक्रमी असल्यामुळें त्यास बादशहानें **'सवाई संताजीराव'** असा किताब दिला होता. या हिशोबावरून याची **बनसीपुरी** गोसावी व **त्र्यंबक विश्वनाथ पेठ्ये** यांच्यांशीं हजारों रुपयांची देवघेव होती असें दिसतें. बनसीपुरी हा भोसल्यांचा मोठा सावकार होता. राणोजी हा १७३३ च्या जंजिऱ्याच्या स्वारींत होता व यास महाराजांनीं निजामावरील स्वारीसाठींही बोलावलें होतें. १७३५ च्या शेवटी झाला राजद्रोहाच्या आरोपावरून महाराजांनीं बोलावलें होतें (पे. द. ३३-७९,१२७ व १३८ पहा) **पत्र नं. ५५ वरून राणोजीचा आंग्रे** व **महादाजी गणेश** कुंटे यांशीं संबंध आलेला दिसतो. **कुंटे** हा **वसईच्या** किल्ल्यावर सुभेदार होता (पे. द. ३५-२१० पहा) पत्र नं. ६० वरून वैद्य हे राणोजीस अगदीं किरकोळ १०१५ रुपये ही देत असत असें दिसून येईल. **या व पत्र नं. ७२ व ७७** मध्यें **सताप्पा मारुलकर** याचें नाव आलें आहे. वै. द. खंड १ मध्येंही २ पत्रांत त्याचा उल्लेख आहे. हा एक व्यापारी दुकानदार होता. वरचेवर वैद्यांकडून तो पैसे नेत असे. **पत्र ६९ धोंडो महादेव कुंटे** याचा हिशोब आहे. हा वसईचा सुभेदार **महादाजी गणेश याचा मुलगा** असावा. यांत विशेष असा आहे कीं, यास दिलेले पैसे द. म. द. शें. रु. १॥ प्रमाणें दोन महिन्यांच्या मुदतीनें दिले होते. मुदत चुकल्यास दुप्पट व्याज देण्याचें कुंट्यांनीं कबूल केलें. मुदत चुकूं नये यासाठीं ही अट आपण होऊन ऋणकोनें घातलेली दिसते. पत्र **नं. ७१ हा दुर्गोजी महाडिकाचा** हिशोब आहे. त्याचे पैशास **नरसिंगराव जामीन** राहिला आहे तो जगथाप की काय समजत नाहीं. महाडिक घराण्याचा छत्रपतीशीं संबंध आहे. **हरजी महाडिक** हा शिवाजीचा जावई (अंबिकाबाईचा नवरा) होता. त्याचा मुलगा **शंकराजी** यास शाहूची बहीण **भवानीबाई** दिली होती. तिला शाहूने **तारळें** महालाची सरदेशमुखी दिली होती. **दुर्गोजी** हा शंकराजीचा मुलगा आहे (म. रि. नानासो पान १०७ पहा). दुर्गोजीचे मुलगे **स्वरूपजी** व **प्रतापजी** यांजला सन १७५४ मध्यें विश्वनाथ भटांनीं पैशाचा लगादा केल्याबद्दलचीं पत्रें आहेत. **पत्र नं. '१९** व वै. द. खंड १. ६८ मध्यें **शिवराम तुकदेव** याचें नांव आलें

आहे. यानें लिहिलेलीं पत्रें नानासाहेब यांच्या कारकीर्दीतील पुष्कळ आहेत. त्यांत त्याचें आडनाव **करमरकर** असें आलें आहे. या हिशोबांत याच्या नांवावर फार थोड्या रकमा आहेत. पण पुढील काळांत त्याचे हातून वैद्यांच्या तर्फे फार मोठ्या कामगिऱ्या व पैशाचे व्यवहार झाले आहेत. हा वैद्यांचा कारकून होता. याचे बरोबर **धोंडो अनंत जोग** हाही वैद्यांच्या कान्हाटी व जांभळी ह्या इनाम गांवांच्या वसुलाचें काम करीत असे. कान्हाटी-च्या भोवतालचा मुलूख **सरलस्कर**चा होता. त्यांनीं कर्जफेडीसाठीं निकडील **चोपडज, भटगव्हण, वाकी, मावडी, बऱ्हाणपूर, मेडद** वगैरे गांवचा मोकासा वैद्यांना लाऊन दिला होता. तो वसूल करण्यास सरलस्करांचे कारकून अडथळे करीत, त्यासंबंधीं वैद्यबंधूस यानें पुष्कळ पत्रें लिहिलीं आहेत. शिवराव तुकदेव वऱ्हाडांत ही गेलेला होता. त्यानें **पद्मोजी जाच**काची तरफदारी वैद्यांकडे केल्याचीं बरींच पत्रें आहेत. **सचिवांस** वैद्यांनीं हप्त्याहप्त्यांनीं कर्ज देण्याचें कबूल केलें होतें. ते पैसे वेळेवर कसे भरावे तें लिहून हप्ता चुकूं नये म्हणून कर्ज काढूनही यानें पैसे दिले आहेत. कान्हाटी गांवीं पागा बांधून घोडीं व उंट यांची निगा घेण्याचें काम यानें केलें आहे. याचें हस्ताक्षर फार चांगलें आहे. पत्र नं **७३** व **७७** यांतील हिशोबांत **धोंडो रुद्र करमरकर** व **कृष्णाजी विठ्ठल शेणवी** ह्या दोन व्यक्ति नवीन आल्या आहेत. याबद्दल पुढील खंडांत पत्रें येतील तेव्हां माहिती मिळाल्यास दिली जाईल.

**४.** या खंडांत छापलेल्या कागदांचें महत्त्व काय आहे हें स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे. या खंडाच्या सूचीवरून वैद्य घराण्याचा १७४० पर्यंत कोणकोणत्या घराण्यांशीं व व्यक्तींशीं संबंध आला हें कळून येईल. याचें महत्त्व असें आहे कीं, वैद्य घराण्याचा ज्या घराण्यांशीं संबंध आलेला आहे तीं घराणीं अजूनही विद्यमान असून कांहीं सुस्थितींत आहेत. त्यांचेकडे जुनें दफ्तर असण्याचा संभव आहे. तें दफ्तर म्हणजे पत्रव्यवहार व जमाखर्च यांचेंच असणार. त्यांत कांहीं लग्नांचे व प्रवासाचे ताळेबंदही असू शकतील. वैद्यांची राजकीय व खाजगी स्वरूपाची माहिती यांच्या दफ्तरांत मिळू शकणार आहे; कांहीं पत्रांतून व्यक्तींच्या मूळ ठिकाणाची व मुक्कामाची माहिती मिळते, त्यावरून त्या ठिकाणाचें महत्त्व कळून येणार आहे. उदाहरणार्थ केतकर यांचें मूळ ठिकाण कोंकणांतील केतकी चिवली आहे तरी एका कागदांत त्यांचें राहाण्याचें ठिकाण जकातवाडी दिलें आहे. असेंच आणखी कांहीं कुटुंबांचें राहाण्याचें ठिकाण जकातवाडी दिलेलें आढळून येतें. यावरून हल्लीं उजाड जाहलेल्या जकातवाडींत पूर्वी कोणकोणतीं कुटुंबें होतीं याचा सुगावा लागणार आहे. अशाच प्रकारचें गोडबोले हें कुटुंब आहे. जरी मूळ हें माहुलीचें म्हणून समजण्यांत येतें तरी तें कोंकणांतून माहुलीस आलें व तेथून दुसरीकडे गेलें असें म्हणतां येईल. आमच्या पत्रांत एक गोडबोले कुटुंब जकातवाडीचें म्हणून दिलें आहे. तें माहुलीहून जकातवाडीस राहाण्यास गेलें असेल. तसेंच नागपूरच्या बारपुत्र्यांचें राहाण्याचें ठिकाण ' अकोळनेर हल्लीं वस्ती नागपूर ' असें एका कागदांत आहे. अशा तऱ्हेचीं दफ्तरांतील माहिती त्या त्या कुटुंबांच्या कुलवृत्तांतास उपयुक्त होईल.

**५.** दफ्तरांतील कागदांस तारीख मिती देतांना पुष्कळ अडचणी उत्पन्न होतात. यासंबंधीं त्रै. व. २० अं. ४ पृ. १३३ व व. २२ अं. २ पृ. ६० यांवर रा. **बळवंत दत्तात्रय आपटे** यांचे दोन लेख आले आहेत. ते वाचले असतां जुने जमाखर्च व मुक्कामाची मुसलमानी व मराठी तारीख व वार देणारे जुने कागद यांचें महत्त्व काय आहे तें कळून येईल. पत्रांतील कांहीं तारखा व वार, जंत्रींतील वार व मुसलमानी तारखा यांशीं जमत नाहींत. कागदांतील अधिक महिना व जंत्र्यांतील अधिक महिना यांतही फरक पडतो. यांचीं कारणें या निबंधांत रा. आपटे यांनीं स्पष्ट करून सांगितलीं आहेत. ह्यासंबंधीं संशोधन करण्यासाठीं जुने कागद उपयोगांत आणले पाहिजेत, ह्या त्यांच्या म्हणण्याचा मलाही प्रत्यय आलेला आहे. या दृष्टीनें माझें दफ्तर उपयोगी पडेल यांत शंका नाहीं. या खंडांत अशा तऱ्हेचे कागद व हिशोब छापिले आहेत त्यांचा संशोधकांनीं उपयोग करावा व मजजवळ जे १७३५ ते १८५० पर्यंतचे जमाखर्चाचे कागद आहेत त्यांचाही कोणी संशोधक उपयोग करण्यास तयार असेल तर ते दाखविण्यास माझी हरकत नाहीं.

( पुढील मजकूर पान २२ वर पहा. )

# अधिक मासाचें

| | मोहरम | | सफर | | रबिलावल | | रबिलाखर | | जमादिलावल | | जमादिलाखर | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | श. | स. | श. | स. | श. | स. | श. | स. | श, | स. | श. | स. |
| | १५६६ | १६४४ | १७६४ | १८४२ | १६०४ | १६८२ | | | १७०७ | १७८५ | | |
| चैत्र | | | | | १६६९ | १७४७ | | | | | | |
| वैशाख | | | १६३१ | १७०९ | | | १७३४ | १८१२ | १५७४ | १६५२ | १७७२ | १८५० |
| | | | १६९६ | १७७४ | | | | | | | | |
| ज्येष्ठ | १६५८ | १७३६ | १५६३ | १६४१ | १६६१ | १७३९ | १६०१ | १६७९ | | | १६३९ | १७१७ |
| | १७२३ | १८०१ | | | | | | | | | १७०४ | १७८२ |
| | १७८८ | १८६६ | | | | | | | | | १७६९ | १८४७ |
| आषाढ | १५९० | १६६८ | | | १६२८ | १७०६ | | | १६६६ | १७४४ | १५७१ | १६४९ |
| | १६५५ | १७३३ | | | १६९३ | १७७१ | | | १७३१ | १८०९ | १६३६ | १७२४ |
| | | | | | १७५८ | १८३६ | | | | | | |
| श्रावण | १५८७ | १६६५ | १७२० | १७९८ | १५६० | १६३८ | | | १५९८ | १६७६ | १५६८ | १६४६ |
| | | | १७८५ | १८६३ | १६२५ | १७०३ | | | १६६३ | १७४१ | | |
| | | | | | १६९० | १७६८ | | | १७२८ | १८०६ | | |
| भाद्रपद | | | १६५२ | १७३० | | | | | | | | |
| | | | १७१७ | १७९५ | १५५७ | १६३५ | १७५५ | १८३३ | १५९५ | १६७३ | | |
| आश्विन | १६७९ | १७५७ | | | १७८२ | १८६० | १६२२ | १७०० | | | १६६० | १७३८ |

( पान १९ वरून पुढें चालू )

६. के. **दत्तोपंत आपटे** यांनीं आपले चिरंजीव बळवंतराव यांचे ठिकाणीं ऐतिहासिक विषयांची व ज्योतिषशास्त्राची गोडी उत्पन्न केली आहे. यामुळें त्यांना दोन्ही विषयांची माहिती जमा करून लिहून काढतांना चिरंजिवांचा पुष्कळ उपयोग होत असे. रा. बळवंतराव यांनीं वडिलांच्या सांगण्यावरून अधिक-मासांचें एक कोष्टक तयार केलें होतें तें मला त्यांचेकडून मिळालें होतें. त्याचा मला पुष्कळ उपयोग झाला. सन १७६३ मध्यें जंत्रीत अधिक ज्येष्ठ महिना दिला आहे तो माझ्या जुन्या कागदांत अधिक आषाढ आहे, हें मी के. दत्तोपंत यांस दाखविलें होतें. अशा चुका थोड्याच असणार, तथापि कांहीं कागदांत नुसता अधिक महिना दिलेला असतो. त्याचें नांव दिलेलें नसतें. अशा स्थितींत कागदांतील मुसलमानी किंवा मराठी महिना पाहून शक काढण्यास त्यांनीं केलेलें कोष्टक उपयोगी पडेल. हें कोष्टक सन १७०० ते १८०० पर्यंत चेंच होतें. तें शिवकालीन जंत्रीचे व मोडक शकावलीचे साहाय्यानें रा. आचासाहेब जोशी यांनीं जास्त विस्तृत करून दिलें आहे. हें विस्तृत कोष्टक संशोधकांच्या उपयोगासाठीं या खंडांत रा. बळवंतराव यांच्या सूचनेवरून देत आहें. अधिक महिना शेवटच्या ५ महिन्यांत येत नसल्यानें कोष्टक ७ महिन्यापुरतेंच आहे.

७. सावकार लोकांनीं आपली संपत्ति सांठवून न ठेवतां धामधुमीच्या काळांत देखील राजे लोकांना व सरदारांना दिल्याचें दिसून येतें. अर्थशास्त्राचा नियम असा आहे कीं, संपत्तीचें चलन असलें तरच ती जिवंत समजली जाते. हा नियम त्यांना पूर्ण माहीत होता असें म्हणावें लागतें. त्यांनीं आपली संपत्ति पुरून ठेविली असती तर त्यांना काय हरकत होती! पण तसें न करतां दररोज कितीतरी देवघेवीचे व्यवहार ते करीत होते असें त्यांच्या जमाखर्चाच्या कागदांवरून दिसून येतें. पूर्वीचे लोक संपत्ति पुरून ठेवीत असा लोकापवाद आहे, त्यास कांहीं आधार नाहींत असें नाहीं. श्रीमंत लोकांच्या घरीं अशी पुरलेली जुनी संपत्ति सांपडल्याचीं उदाहरणें फार ऐकिवांत नाहींत. संपत्ति पुरून ठेवून ती काढून लोकांस दिल्याचीं कांहीं उदाहरणें आमच्याच दफतरांतील १५०।२०० वर्षांपूर्वीच्या जुन्या कागदांत आढळून येतात. चुलीजवळ किंवा आंब्याच्या झाडाखालीं संपत्ति ठेवल्याचें व ती काढून लोकांस दिल्याचें किंवा खर्चासाठीं ती घेतल्याचे उल्लेख आहेत.

८. आमच्या दफतरांत मराठी राज्यांत सावकारी मोठ्या प्रमाणावर करणारीं कोणतीं कुटुंबें होतीं हें दाख-विणारे कागद पुष्कळ आहेत. कांहींच्या घरीं अजूनही जमाखर्चाचे सुटे कागद किंवा बांधलेल्या वह्या आहेत. मंडळांत पटवर्धन दीक्षितांच्या वह्या आहेत अशा आमच्या दफतरांत ही आहेत व इतरांच्या दफतरांतही सांपड-तील; ह्या वह्यांवरून पूर्वी जमाखर्च लिहिण्याची पद्धत कशी होती, देवघेवीचे व्यवहार कसे होत असत, याचा अर्थशास्त्रदृष्ट्या अभ्यास करण्यास हरकत नाहीं. याशिवाय आणखी एक प्रश्न डोळ्यापुढें उभा राहतो. तो असा कीं, पूर्वी मराठी राज्यांत पंतप्रधान व लढाईवर जाणारे सर्व सरदार लोक हे कर्जबाजारी असतांना त्यांस लढाईवर जातांना खर्चासाठीं कर्जें मिळत असत; कर्ज पुरविणारे बहुतेक ब्राह्मण सावकार व कांहीं गोसावीही होते. त्यांच्या पेढ्या काशीपर्यंत होत्या. त्यांच्या चिठ्या आतांच्या बंकेच्या चेकप्रमाणें या लढवय्या लोकांस उपयोगीं पडत. पूर्वी आतांप्रमाणें पैसेवसुलीचे मार्ग नव्हते. ऋणकोनीं वेळेवर पैसे दिले नाहींत तर आतां कोर्टांत जाऊन त्यांवर हुकुमनामे मिळवितां येतात तशी सोय त्यावेळीं नव्हती. पूर्वी व्याजाचा दर सध्यांपेक्षा जास्त असला तरी तें सर्व व्याज वसूल होत असेल असें वाटत नाहीं. अशा अनिश्चित कालांत सावकार लोक या लढवय्या लोकांस मोठमोठ्या रकमा देण्यास कां तयार होत ही विचार करण्यासारखी गोष्ट आहे. याबद्दल कांहीं तरी त्यांचा विशिष्ट उचतर हेतु असला पाहिजे असें अनुमान काढल्यास चुकीचें होणार नाहीं, असें मला वाटतें. हे गरीबापासून श्रीमंतांपर्यंत पैसे देत असत. गरीबाला पैसे दिले व ते परत आले नाहींत तर त्यावर उपकार केले असें तरी समाधान मानतां येईल; पण कर्जबाजारी श्रीमंतांना व सरदारांना पैसे देण्यांत ते लोक कोणते समाधान मानीत! मला, तर असें वाटतें कीं या लोकांना पैसे देतांना सावकारांनीं दूरवर विचार केला असला पाहिजे. त्यावेळची धामधुमीची परिस्थिति लक्षांत घेतली तर या लोकांना पैशाचा पुरवठाच करण्यास सावकार तयार झाले नसते तर त्यांत त्यांना नांवें ठेवण्यास जागाच नव्हती.

पण तसें त्यांनीं केलें असतें तर त्यांच्या वागणुकीचें राज्यनाशांत पर्यवसान झालें असतें; मराठी राज्य टिकविण्यांतच आपलें व आपल्या देशाचें हित आहे ही जाणीव त्यांस पूर्ण असली पाहिजे व म्हणूनच ते या लोकांस पैसे देण्यास कचरले नाहींत. **स्वराज्य** व **हिंदुधर्मस्थापना** हेंच राजकारणाचें ध्येय आहे ही गोष्ट शिवाजी महाराजांनीं आपल्या वागणुकीनें व पराक्रमानें लोकांच्या मनांत इतकी चिंबविली होती कीं तिचा परिणाम ४।५ पिढ्या राहिलेला दिसून येतो. माझ्या पूर्वजांपैकीं **विश्वनाथभट, बाबुराव** व **नारायणराव** यांच्या चरित्रावरून मला असें स्पष्ट करतां येईल, कीं हे तिघेही शिवाजीचा कारभार पाहण्यास जरी जिवंत नव्हते; तरी शिवाजीचें ध्येय त्यांच्या हाडामासांत खिळलें होतें, तें ध्येय त्यांच्या वेळच्या राजकारणी पुरुषांनीं पाळलेलें त्यांच्या अनुभवास येत होतें. **बाबुरावांना** पेशवे व भोसले यांचा वंश चालू राहून स्वराज्य व हिंदुधर्मस्थापना हीं कायम राहावीं याची चिंता लागून राहिली होती हें त्यांनीं **रघुजी भोसल्यास परसोजी** मुलगा झाल्याचें वर्तमान कळतांच **लक्ष्मण बल्लाळ जोशी** यास ता. २७।९।७८ रोजीं जें पत्र अकोलनेराहून पाठविलें, त्यांत व्यक्त झालें आहे. ते त्या पत्रांत म्हणतात " श्रीमंत पंतप्रधान, व श्रीमंत सेनासाहेब त्यांचे वंशाची वृद्धि व्हावी म्हणजे स्वराज्याची बळकटी व हिंदुधर्मस्थापना बहुत दिवस राहील अशी ईश्वराजवळ नित्य प्रार्थना होती ती पूर्ण झाली " हे उद्गार त्यांनीं पेशव्यास व इतर सरदारास राज्य टिकविण्यासाठीं मदत कां केली हें कोडें उलगडण्यास खास साह्यभूत होतील. जसे बाबुराव हे स्वराज्याचे कट्टे अभिमानी होते तसेच त्यांचे चिरंजीव नारायणरावही होते. त्यांना नाना फडणिसाच्या हाताखालीं बाबुरावांनीं शिक्षण दिलें होतें; दुसरे बाजीरावांच्या कारकीर्दीत ते बाजीरावाच्या दौऱ्यावर स्वखर्चानें कर्ज काढून गेले होते. त्यांनीं त्यावेळीं त्यांचें राज्यचंत्र सुरळीत करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला पण इतर राजकारणी पुरुषांप्रमाणें त्याचे प्रयत्न वांया गेले यांत नवल नाहीं. यांत त्यांनीं आपल्या संपत्तीचा व श्रमाचा इतका व्यय केला कीं, शेवटीं त्यांस मोठ्या कष्टांत दिवस काढावे लागले. माझ्या घराण्याप्रमाणें इतर घराणींही त्यावेळीं पेशवे व इतर सरदार यांस अडीअडचणीला कर्ज देण्यास मागें पुढें पाहत नसत, त्यांस याचा मोबदला स्वराज्य टिकविण्यांत मिळेल असें वाटत होतें अशी माझी समजूत आहे. यांत द्रव्यलोभी कोणी नसतील असें नाहीं. पण सावकार असून जे सल्लागार होते त्यांनीं राज्यविस्तार व राज्यसंरक्षण होण्यासाठींच पैसा पुरविण्याचा मार्ग स्वीकारला असला पाहिजे. पैसा पुरवितांना हा ब्राह्मणेतर हा कोकणस्थ, हा देशस्थ किंवा कऱ्हाडा हा विचार त्यांच्या मनांत बिलकुल आला नाहीं. पेशवे कोकणस्थ असून त्यांस देशस्थ व कऱ्हाडे सावकारांनीं पैसे पुरविले आहेत; सचिव देशस्थ असून त्यांना बहुतेक कोकणस्थांनींच पैसे दिले आहेत. नागपूरकर भोसल्यांनाही ते मराठे असतांना ब्राह्मणांनींच पैशाचा पुरवठा केलेला आहे. या ब्राह्मणेतर व देशस्थ-कोकणस्थ वादाचें भूत अलीकडे आपमतलबी लोकांनीं निर्माण केलेलें आहे. त्यावेळीं तें होतें असें दाखविणारा एखादा कागद असला तरी त्याला महत्त्व देतां येत नाहीं. सरदार व पेशवे यांच्यांत पक्षोपपक्ष होते हें खरें; पण ते निराळ्या कारणांनीं उपस्थित झाले होते. त्यांत जातिभेदाचें खूळ नव्हतें. तें असतें तर मराठी राज्य लवकरच संपुष्टांत आलें असतें. माझ्या पूर्वजांनीं तरी या वादास मुळींच थारा दिला नव्हता हें त्यांनीं आपल्यापाशीं ठेवलेल्या नोकरांवरून व त्यांच्या कृत्यांवरून स्पष्ट होत आहे.

९. ही प्रस्तावना संपविण्यापूर्वीं मला ज्यांनीं साहाय्य केलें त्यांचे आभार मानणें जरूर आहे. खंड १ मध्यें त्यांचा उल्लेख करून त्यांचे मी मनःपूर्वक आभार मानले आहेत व तें साहाय्य त्यांनीं चालू ठेवलें यामुळें माझा हा पुरवणीखंड १ बाहेर पडत आहे व पुढचा खंड हातीं घेण्यास मला उत्तेजन येत आहे हें म्हटल्याखेरीज राहवत नाहीं.

**१०. माझ्या शारीरिक दौर्बल्यामुळें मला साताराचा घरचा छापखाना असून येथील छापखान्यांत हा खंड** छापावा लागत आहे व ती सोय माझे चिरंजीव बाबुराव यांनीं केली, व छपाई सुरू झाल्यावर पुढें नवासून

वेळेवर देण्याघेण्याचें काम होणें मला त्रासाचें होईल हें लक्षांत घेऊन कऱ्हाडचे रा. रा. बाबुराव गोखले यांस येथें आणलें व माझ्या मदतीस दिलें, म्हणून हा खंड लवकर तयार करण्यांत आला. रा. बाबुराव गोखले यांच्या सारख्यांचें सहाय्य मला पुनः झालें तर पुढचा खंडही लवकर निघेल अशी मला खात्री वाटते.

११. खंड १ मधील ७१ पत्रांत बऱ्हाणपुराहून नागपूरचा रस्ता दिला आहे व तसें मूळ प्रतीवरून जरी छापिलें आहे तरी तो नागपूर ते बऱ्हाणपूरचा रस्ता आहे असें रा. शंकर बळवंत सहस्रबुद्धे (गोंदिया) यांनीं माझ्या नजरेस आणलें याबद्दल मी त्यांचा आभारी आहें.

१२. रा. यशवंतराव फके या एकाच साहाय्यकाचा निर्देश करण्यांत मजवर पक्षपातीपणाचा दोष येणार नाहीं अशी माझी मनोदेवता मला सांगते. त्यांचें साहाय्य अमोलिक आहे. त्यांचा माझा जरी फार वर्षांचा परिचय आहे तरी या कामांत त्यांचें मला जें साहाय्य मिळालें व मिळत आहे तें माझ्या कल्पनेपलीकडे आहे. मी रोज सकाळीं वेळ मिळाला कीं जुन्याकागदांचें पुडकें घेऊन त्यांजकडे जाण्याचा क्रम आज दोन वर्षें ठेविला आहे. व असाच पुढें ठेवणार आहें. कागद पाहून निवडण्यांत, नकललेले कागद तपासण्यांत, सूचि करण्यांत व कांहीं ऐतिहासिक गोष्टींबद्दल शहानिशा करण्यांत व मोडी अक्षर लावण्यांत कधींही त्यांनीं कंटाळा दाखविला नाहीं. हें काम करीत असतांना कधीं कधीं आम्ही इतके गढून जातों कीं, वेळेचें भान रहात नसल्यामुळें मला घरीं येण्यास १ वाजूनही जातो. त्यांचें साहाय्य कांहीं विघ्नें न येतां असेंच मिळत जावें अशी माझी ईश्वरापाशीं प्रार्थना आहे. तें सहाय्य मिळत राहिलें तर माझे दफतरांतील निवडक कागदांचे खंड पेशवे दफतराप्रमाणें लवकरच बाहेर पडतील अशी मला आशा आहे. भारत इतिहास संशोधक मंडळानें या खंडाचा पुरस्कार केला आहे व प्रकाशक होण्यास तयारी दर्शविली याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. पुनः पहिल्या खंडांतील प्रस्तावनेंतील शेवटचा श्लोक देऊन ही प्रस्तावना पुरी करतों.

'क्लेशः फलेनहि पुनर्नवतां विधत्ते.'

शं. ल. वैद्य

# वैद्यांच्या वंशावळींतील ऐतिहासिक पुरुषांबद्दल पुरवणी माहिती

पहिल्या खंडांत 'वैद्य दफतराबद्दल माहिती' देतांना ऐतिहासिक पुरुषांचीं त्रोटक चरित्रें व वंशावळ दिली आहे. त्यांत कांहीं चुका आढळून आल्या आहेत व आणखी जास्त माहिती कागदपत्रांवरून निघाली आहे ती खालीं देत आहें.

१ **रघुनाथभट** (३) यांचा मृत्यु वंशावळींत सन १६८७ दिलेला चुकीचा आहे, असें नवीन पाहण्यांत आलेल्या कागदपत्रांवरून दिसून येतें. त्यांचा मृत्यु पौष वद्य ११ शके १६६४ सन १०।१।१७४३ रोजी झाल्याचें सिलकबंदांतील जमाखर्चावरून निश्चित होत आहे. ते सन १६८० मध्यें त्र्यंबकेश्वरीं गेले होते यावेळीं यांचें वय २५ वर्षांपेक्षां जास्त असावें. यावरून यांचें वय मरण समयीं ९० हून जास्त असलें पाहिजे असें वाटतें. यांस तीन मुलगे होते. व ते सर्व १७२० सालापासून कर्तबगार असून देवघेवीचे व्यवहार करीत होते असें कागपत्रावरून दिसून येतें. **भास्करभटाचा** जन्म शिवकालीन व **बाळंभट** व **विश्वनाथ** भट यांचे जन्म संभाजी किंवा राजाराम यांच्या कारकीर्दींतील असावेत, असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. रघुनाथभटाच्या बायकोचें नांव निश्चित सांगतां येत नाहीं. तिचें नांव आपल्या चालीप्रमाणें **जानकी** म्हणतां येईल तिचें वय त्या कालच्या चालीप्रमाणें रघुनाथभटापेक्षां फार तर ५।६ वर्षांनीं कमी असेल. तिची मृत्युतिथि पौष शु. १।१६६४ सन १७।१२।१७४२ सिलकबंदावरून निश्चित होते. ती सौभाग्यवती वारली. दोघे

नवराबायको कोंकणांतच राहत असावी. वृद्धापकाळीं दोघं देशावर वाईस आलीं व तेथेंच वारलीं. रघुनाथभट यांचें या काळचें एक पत्र सांपडलेलें दिलें आहे. तें कोंकणांतून लिहिलेलें आहे. कचरे गांवची खोती करून ते तिकडे राहत. त्यांची मृत्युतिथि जमाखर्चावरून निश्चित करण्यास धार्मिक वृत्तीचा उपयोग झाला. दोघांच्या मृत्यूनंतर दर महिन्यास उदकुंभ व मासिकें यांचा खर्च पडल्याच्या नोंदी मिळतात. मासिकें मृत्युतिथीलाच दिलेलीं असतात. तसेंच वर्षश्राद्ध, श्राद्ध व पक्ष यांचे जमाखर्च मिळाल्यामुळें तिथींचा निश्चितपणा ठरवितां आला. वडील व मातोश्री निवर्तल्यानंतर कांहीं लोकांचीं दुखवट्याचीं पत्रें बाळंभट व विश्वनाथभट (४) यांस आलेलीं आहेत. महाराजांची स्त्री सौ. मा. **सकवारबाई** इला सातान्यास भेटून बाळंभट व विश्वनाथभट नुकतेच वाईस गेले व लागलीच पौष शु. १ रोजीं मातोश्री वारल्या. हें बाईसाहेबांस तावडतोब कळलें, तेव्हां त्यांनीं पौष शु. २ रोजीं त्यांना दुखवट्याचें पत्र लिहिलें आहे. पौष व. ११ रोजीं वडिल रघुनाथ भटही वारले. ही बातमी कोंकणांत कळल्यावर पनळीचे खोत केशव विश्वनाथ व नांदिवड्याचे बाळंभट दातार व कृष्णंभट काळे यांचीं दोघांच्या दुःखसांत्वनार्थ पत्रें आलीं आहेत.

(२) **भास्करबावा** (४) यांची पहिली बायको **लक्ष्मीबाई** इचें माहेरचें नांव **जाईबाई** होतें. इचें माहेर जोगांच्या येथें नसून नांदिवड्याच्या दामल्यांकडे होतें. तिच्या भावाचें नांव धोंडभट होतें. भास्करबाबा वारल्यावर ती बहुतेक कोंकणांतच होती. तिला तेथील जमिनीचें उत्पन्न मिळेल अशी तजवीज केली होती. दोघां दिरांशीं तिचें जमत नसावें असें दिसतें. विश्वनाथभट वारल्यावर बाळंभट व विश्वनाथभट यांच्या चिरंजीवांनीं मिळकतीच्या वाटण्या केल्या. त्यांत लक्ष्मीबाईच्या पोटगीची व मिळकतीची तजवीज केली होती; पण तिला दिलेलें जमिनीचें उत्पन्न वेळचेवेळीं मिळेना म्हणून तिनें आपल्या पुतण्यांस वेळोवेळीं त्याबद्दल पत्रें पाठविलीं आहेत. ती नांदिवड्यासच १३।६।१८१३ रोजीं वारली, दीर्घायुषी होती. भास्करभटांची दुसरी बायको **सखूबाई** हिचें माहेर करमरकरांकडे होतें. तिचे भाऊ लक्ष्मण व गणेश हरि होते. सखूबाई काशीस जाऊन आली होती. तिला वैद्यबंधूंनीं खर्चासाठीं काशीसच पैसे मिळण्याची तजवीज केली होती. तिकडून आल्यावर तिनें मावंद्यासाठीं ब्राह्मणभोजन घातलें व इतर बराच दानधर्मही केला.

(३) **बाळंभट** (४) यांची मृत्युतिथि चुकीची दिली आहे. ते पुण्याहून वाईस जातांना शिवापुरास अतिसार होऊन श्रा. शु. १४।१६७५ सन १२।८।१७५३ रोजीं रविवारीं वारले. त्यांचेबरोबर विश्वनाथ भट होते. पुण्याहून निघतांनाच त्यांस अतिसाराचा विकार झाला होता. त्यांच्या दहनाचे जमाखर्च मिळाले आहेत. **गंगाबाई** ही त्यांची वडील बायको असून हिला भिकंभट व रामभट (५) असे दोघे मुलगे झाले होते. दुसरी बायको **सरस्वतीबाई** हिला अनुबाई, व कृष्णराव अशीं दोन अपत्यें झालीं होतीं. गंगाबाईचें माहेर नांदिवड्यास जोगांकडे होतें. तिच्या भावाचें नांव विश्वनाथपंत होतें. अनुबाई भिकाजी नाईक रास्ते यांचे चि. गंगाधरराव यांजला दिली होती. इचें सासरचें नांव सगुणा होतें. इचे पुष्कळ जमाखर्च दफतरांत आहेत. गंगाबाईचा भाऊ विश्वनाथपंत व भाचा बापूजी जोग यांचीं पत्रेंही पुष्कळ आहेत. सरस्वतीबाई काशीयात्रेस १७९४ मध्यें गेली होती तेथेंच ती वारली. तिनें तेथें सहस्रभोजनें घातलीं होतीं. हिचें माहेरही जोगांकडेच होतें.

(४) **विश्वनाथभट** (४) यांच्या मृत्यूची तारीख सन ३१।८।१७६० पाहिजे. त्यांची स्त्री उमाबाई हिचें माहेर माखजनच्या पटवर्धनाकडे होतें.

(५) **भिकंभट** (५) यांची मृत्युतिथि चैत्र वद्य ४।१६८१ सन १६।४।१७५९ आहे. त्यांची बायको **गोपिकाबाई** इचें माहेर राजवाडे यांजकडे होतें. ही सदाशिव रघुनाथ यांची मुलगी. तिनें रामेश्वराची यात्रा केली होती. ती आषाढ शु. ३।१६९७ सन २०।६।१७७५ रोजीं वारली.

(६) **रामभट ऊर्फ नाना** (५) यांच्या मृत्यूची तारीख १०।१।१७६९ मंगळवार आहे. यांची सासुरवाडी पाडळीचे आठवल्यांकडे होती. यांची मुंज व बहीण अनुसयाबाईचें लग्न हीं कार्यें फा. शके १६६९ मध्यें झालीं. रामभटाचें लग्न फा. शुद्ध शके १६७४ झालें.

( ७ ) **बाबुराव विश्वनाथ** (५) याची जन्मपत्रिका मिळाली आहे. त्यांत त्यांची जन्मतिथ मार्गशीर्ष शुद्ध १३।१६६७ सन २९।११।१७४५ सोमवार दिली आहे. त्यांची पहिली बायको पार्वतीबाई ( कृष्णाजी हरि साठे यांची थोरली मुलगी ) २४।१०।१७५८ रोजीं वारली. तिचें माहेरचें नांव बचाबाई होतें. तिचें लग्न ३।३।१७५६ रोजीं झालें. तेव्हांपासून ती आजारीच असल्यामुळें तिचे हयातींतच बाबुराव यांचें दुसरें लग्न सदाशिव बल्लाळ जोग यांच्या मुलीबरोबर २६।३।१७५८ रोजीं करावें लागलें. कृष्णाजी हरींची धाकटी मुलगी गंगाबाई ही नारायणराव पेशवे यांस दिली होती. बाबुराव, व नारायणराव पेशवे यांचे साडभावाचें नातें होतें. बाबुरावांची दुसरी बायको **रमाबाई** ऊर्फ आकाबाई ही वैशाख शु. १२।१७६० सन ६।५।१८३८ रोजीं वाईस वारली. हिनें मरणापूर्वी आषाढ शुद्ध ११।१७५९ सन १४।८।१८३७ रोजीं सर्वप्रायश्चित्त घेतलें होतें. त्याबद्दल चिरंजीव आनंदरावांनीं बराच खर्च केला. ही बाई शरिरानें फार स्थूल असावी. इचा बसावयाचा पाट जो आम्हांस वडील मंडळींनीं दाखविला तो चुन्याचा हौद पाण्यानें भरल्यावर त्यावर झांकण म्हणून घालीत असत.

( ८ ) **कृष्णराव ऊर्फ बळवंतराव तात्या** ( ५ ) यांचें लग्न पानिपतवर पडलेल्या रामाजी अनंत दाभोळकर यांच्या मुलीबरोबर माघ व. ४।१६८४ सन २।२।१७६३ रोजीं झालें. तिचें माहेरचें नांव भिऊबाई व सासरचें नांव रखमाबाई ऊर्फ ताई होतें. यांस ८ मुली होत्या. यांचें जन्म, व लग्नसंबंध याची माहिती सोबत दिली आहे. तीवरून असें दिसून येतें कीं, त्याकाळीं मुलींचीं लग्नें ४ ते ७ वयाच्या दरम्यान होत असत.

| नांव | जन्म | लग्न | नवऱ्याचे नांव |
|---|---|---|---|
| १ मैनाबाई<br>( ) | पौष शु. ७।१६९४<br>३१।१२।१७७२ | फा. व. ७।१६९७<br>१२।३।१७७६ | ढमढेरे ( पुणें )<br>? |
| २ बयाबाई<br>( भागीरथी ) | श. १६९६<br>स. १७७४ | १७०२<br>१७८० | बापूजी नारायण<br>परचुरे ( पुणें ) |
| ३ सगाबाई ऊ. आक्का<br>( ) | पौष व. २।१६९७<br>७।१।१७७६ | वै. शु. १५।१७०२<br>१४।५।१७८० | बळवंत विश्वनाथ<br>जोशी ( सातारा ) |
| ४ बगाबाई ऊ. जिजी<br>( गंगाबाई ) | माघ कृ. १०।१६९९<br>२१।२।१७७८ | जे. शु. १०।१७०५<br>६।६।१७८३ | गोविंद अमृत<br>गोडबोले ( पुणें ) |
| ५ काशीबाई<br>( जानकी ) | फा. १७०२<br>३।१७८१ | मार्ग. शु. ३।१७०९<br>१२।१२।१७८७ | रामचंद्र आपाजी ऊ.<br>बाबा साठे वाई-सुसेरी |
| ६ अंबाबाई ऊ. ताई<br>( काशीबाई ) | वै. शु. ७।१७०९<br>२४।४।१७८७ | वै. शु. २।१७१६<br>१।४।१७९४ | त्र्यंबक अमृत पेठे<br>( पुणें ) |
| ७ वाराणशीबाई<br>( कृष्णाबाई ) | पौ. शु. ९।१७११<br>२५।२।१७९० | फा. शु. ९।१७१९<br>२४।२।१७९८ | बळवंत माधव ऊ.<br>बाळासाहेब रास्ते<br>( वाई–पुणें ) |
| ८ वेणूबाई<br>( ) | ज्ये. शु. ८।१७१६<br>६।६।१७९४ | फा. शु. १७२२<br>फे. १८०१ | शिवरामपंत<br>कानिटकर |

मैनाबाईंचे सासरचें नांव कळलें नाहीं. तसेंच नवऱ्याचें नांवाबद्दलही शंका आहे. बयाबाईच्या जन्म व लग्नतारखा निश्चित कळल्या नाहींत. सगाबाईचें सासरचें नांव अजून समजलें नाहीं. काशीबाईची जन्मतिथि कळली नाहीं. वेणूबाईचें सासरचें नांव व लग्नतिथि समजली नाहीं. ज्या कुटुंबांशीं संबंध झाला आहे तीं सर्व

सरदार श्रीमान् घराणीं होतीं व त्यांपैकीं अजूनहीं कांहीं सुस्थितींत आहेत असें दिसून येईल.

( ९ ) **भास्करराव ऊ. बापू** (६) यास रामचंद्र म्हणून मुलगा झाला होता तो काशीस वै.शु.११।७१६ सन १०।४ १७९४ रोजीं वारला. सरस्वतीबाई ( सावत्र आजी ) काशीस गेली असतांना हे मुलाबाळासुद्धां तेथें गेले होते. तिकडील यात्रेच्या हकीगतीचीं पत्रें लिहिलेलीं दफ्तरांत आहेत.

( १० ) **नारायणरावदादा** ( ६ ) यांस धोंडूबाई म्हणून एक मुलगी होती. तिचें लग्न सासवडास भावे यांच्या मुलाबरोबर फाल्गुन शके १७२१ मध्यें झालें. नारायणरावाची बायको लक्ष्मीबाई इचें माहेर रास्त्यांचेकडे होतें. तिच्या वडिलांचें नांव वासुदेव धोंडो रास्ते. हे मेहुणपुऱ्यांतील खंडो नीळकंठ रास्त्यांचे सख्खे बंधु होत. यांस धोंडोपंत ऊर्फ दाजीसाहेब म्हणून मुलगा होता. त्यांचा वाडा वाईस रविवारांत दाजीसाहेब रास्त्यांचा वाडा म्हणून प्रसिद्ध होता. आतां तो विकला गेला आहे. धोंडोपंतास २ बहिणी. त्यांपैकीं वडील बहीण रामचंद्र परशुराम ऊर्फ अप्पासाहेब जमखिंडीकर पटवर्धन यांस दिली होती, तिचें नांव सीताबाई तिचा मुलगा गोपाळराव गादीवर बसला तेव्हां धोंडोपंताकडे कारभार आला होता म्हणून तो धोंडुमामा या नांवानें लोकांत प्रसिद्ध होता. गोपाळरावास अधिकार मिळाला तेव्हां नारायण-रावांना सांपत्तिकदृष्ट्या त्यांचेकडून आईचें मागण्यावरून बरीच मदत होत असे.

( ११ ) **माधवराव** ( ६ ) हा बाबुरावाचा दुसरा मुलगा. याचा जन्म स. १७७६।७७ मध्यें झाला असावा. त्याचें लग्न मार्गशीर्ष शके १७०९ सन १७८७ मध्यें झालें. त्याची बायको राधाबाई सन १८०० मध्यें वारली. त्याला मूलबाळ नव्हतें.

( १२) **आनंदराव** ( ६ ) यांचा प्रथम विवाह शारंगपाणी यांच्या मुलीबरोबर पौष व. ५।१७०८ सन १९।१।१७८७ रोजी काशी येथें झाला. त्यावेळीं बाबुराव काशीयात्रेस गेले होते. बायकोचें नांव साळू-बाई इजपासून त्यांना एक मुलगी झाली होती. तिचें नांव कुसाबाई. दुसरी बायको उमाबाई उर्फ काकूबाई इज-पासून त्यांना मूल झाल्याचें दिसून येत नाहीं. जमखिंडीचे गणेश दिवाकर वैद्य यांच्या मुलगा सखाराम यास नारायणराव यांनीं आनंदरावांस दत्तक देविला. त्याची मुंज वै. शु. ५।१७४५ सन १५।५।१८२३ रोजीं झाली. त्याचें लग्न अकोळनेरच्या दाभोळकरांच्या मुलीबरोबर पुण्यास ५।१।१८२७ रोजी मोठ्या थाटांत झालें. मुलीचें नांव बयाबाई होतें. हीं दोघें नवराबायको अनुक्रमें १३।४।१८३६ व १५।५।१८३७ रोजीं वारल्यावर आनंदरावांनीं **माधवराव ( ७ )** यास ९।११।१८३७ रोजीं दत्तक घेतलें. हे जमखिंडी संस्थानांत मुनसफ व देहेनगी कामगार होते. ते वाईस १८७५ मध्यें समाधिस्त झाले. सिद्धेश्वराचे देवालयाचे उत्तरेस तटावर यांची समाधी आहे. तिचेजवळ त्यांचे स्नेही बाबाजी सुभेदार तळवळकर यांची समाधि आहे, तिचा चौथरा मोठा आहे. सर्व कागद व जमाखर्च नीट पाहून न झाल्यामुळें या माहितींतही कांहीं दुरुस्त्या व जास्त माहिती देण्याचा प्रसंग येणार नाहीं असें नाहीं. यानंतर निघणाऱ्या खंडांत इतरत्र मिळेल ती माहिती देण्यांत येईल.

376, Budhawar Peth, Poona 2
29th Aug. 1944

From,

Shankar L. Vaidya, Esq., L. Ag.,
Government Pensioner & Inamdar

To,

The Sub-committee recommended by the Aligarh Historical Records Commission and sanctioned by the Government of India.

Subject :—Vaidya Daftar–Estimate of the cost of Calendaring of important Historical documents in—

Sir,

The Daftar placed before the Committee for observation consists of the following parts :—

I. This part contains accounts i. e. Jama Kharch ( जमाखर्च ) arranged into bundles of following years :
1735 to 1749, 1749 to 1761, 1761 to 1769, 1769 to 1800 and 1800 onwards. In them is found much information of daily household transactions, money-dealings and other matters of private and public interest. All these are not scrutinised by me as yet.

II. This part contains letters written by clerks to Vaidyas or any other persons who might be relatives, creditors, debtors, or officials and vice versa. They are kept nearly in 55 bundles containing on an average nearly 50 in each. They are to be read yet and selection of important letters has to be made; then they are to be dated, copied into Balbodh Marathi, compared with the original and indexed. In these bundles are found many Ayurvedic prescriptions of medicines on diseases. They are being collected and will be printed in a separate volume.

III. This part is vary important. It contains nearly more than 2,000 mostly historical letters which are dated, copied, compared and indexed. They are of the period of years 1735 to 1818 and onwards. Some of them are yet to be compared and indexed and some are only to be indexed.

IV. This part again contains selected important historical papers of the same period which are only dated; copying, comparing and indexing are to be made.

V. This part contains Daftars of Pant Sachiv, Patwardhans (Chiefs), Kales, Thattes and of other families who were relatives of Vaidyas or had money dealings with them. These are made use of and will be made use of for writing the family histories. Some Daftars contain Horoscopes, accounts of marriages, munjees, pilgrimages and of other occasional ceremonies, religious and social.

VI. This part contains Inam Daftars and is voluminous. Some inams were resumed and others were inquired into by the inam-commission and allowed to be continued to the Vaidya family. The inam Sanads are kept in a separate bundle.

VII. There are bound books ( Vahis ) of daily accounts ( रोजकीर्द ) and ledgers ( खतावणी ) of some 15 years which contain historical and household accounts of important incidents and give the full names of important persons who had money dealings with the Vaidyas.

VIII. This part contains bundles of important documents secured from historical families such as Khandkars, Joshi ( Babuji Naik's branch ) of Satara, and of copies of nearly 200 documents of the Satara Parasnis Museum ( New Deccan College Museum ) and a bundle of hand written old Panchangas.

2. The Sub-Committee is going to give an estimate of the cost of calendering the valuable records in my possession. Though I am one of the members of the committee, I am inclined to say that it is very difficult to estimate the required cost even approximately unless the valuable record is first determined. The estimate made by a sitting or two will be one similar to that made by the Engineering Department which always requires in the case of major works, to be supplemented by new grants to finish the intended work.

3. The discussion leads me to think that the Committee are of opinion that the Calendaring is very difficult and will not satisfy the need of the public interested in history as adequately as the book containing the original documents published fully and properly dated, with explanatory notes. It is not adivsable to ask Government to spend money on an in-complete and inefficient work. After discussing the utility of Calendaring, I proposed a cheapest and easiest course to be followed under the present circumstances of the Daftar in my possession.

4. I have lately published Vol. I of selected documents of the Daftar, upto now read by me, for the period between 1641 to 1740. It contains in addition to 71 original documents, a detailed account of the

Daftar and a report of Rao Bahadur G. S. Sardesai, made on going through nearly 1500 documents which were ready for printing. The Volume II will contain documents of the period extending over 10 years i. e. to the end of Shahu's death ( 15-12-1749 ). They would number not less than 500. The Volume III will be for the period extending over nearly 11 years i. e. to the battle of Panipat or to the end of the regime of Nana Sahib Peshwa (23-6-1761). It will contain more than 6 or 7 hundred documents which are ready for printing. I need not give the details and extent of the remaining volumes that will follow one by one. The number of documents is decidedly greater in each.

5. With such a ready material on hand I on my part make the following three plausible suggestions on the supposition that the present move of Government is expressive of their keenness to bring out the historical records of my Daftar to the notice of the public interested in the History of India as early as possible.

(1) I am prepared to spend at present for the publication of the historical papers selected form my Daftar. But owing to the Paper Control imposed on the press I am unable to go through the work. I have secured the necessary paper, but the quota assigned to the Anand Press of Satara in which I mean to publish my volumes is very much restricted and does not allow the Press to take up the work. The Government of India should therefore, be requested to write to the Paper Controller of the Bombay Presidency to allow the press to use the paper for the purpose of my work beyond the quota given to it by the rules.

(2) It is well-known that the copies of such historical books have a very scanty sale in the public. The Government of India should, therefore, be requested to patronize my Volumes by buying a reasonable number of copies for distribution in the whole of India. This number should not be in my humble opinion less than 5 or 6 hundred. It is not possible for a man of 73 years to work privately in the direction of getting a good sale of the copies of books in the public. I am not sufficiently strong in health and am very unwilling to spend my time otherwise than the reading and selection of documents of my Daftar to continue the publication. I have printed only 250 copies of the first Volume, including those necessary for free distribution. I wish that I should know how many copies the Government are going to patronize before I begin the printing of the second Volume.

